मूळ ओवीबद्ध दिव्य ग्रंथांचा



**पंडित आनंदघनराम**



यांच्या प्रासादिक लेखणीतून उतरलेला कथारूप आविष्कार




**अंजली पब्लिशिंग हाऊस**

'सप्तशृंगी', १५११ - सदाशिव, टि. स्मा. मं. ते पेरुगेट रस्ता, पुणे ३०

© कार्यालय : ४४८ ५०९१ निवास : ४४८ ९२८७ गोदाम : ४४७ १९२५


# [illegible]मास माहात्म्य कथासार



संपादक : पं. आनंदघनराम

मूळ ओवीबद्ध पोथीचा रसाळ गद्यानुवाद



# ।। अधिकमास माहात्म्य ।।

[ कथासार ]

■ ■ ■

महर्षी व्यासांनी 'पद्मपुराण' नावाचा ग्रंथ लिहिला. त्यात 'अधिकमास माहात्म्य' वर्णन केले आहे. त्या ग्रंथाचे प्राकृतात अनेक लेखकांनी रूपांतर केले आहे. मराठीतही ओवीबद्ध 'अधिकमास माहात्म्य' रचले आहे. त्याच्या आधारे हे 'कथासार' सिद्ध केले आहे!



।। निवेदक ।।

## ।। पं. आनंदघनराम ।।

■

## ।। अंजली पब्लिशिंग हाऊस, पुणे ३० ।।

॥ प्रकाशक ॥
आनंद साने
अंजली पब्लिशिंग हाऊस
१५११ सदाशिव पेठ, पालकर चाळ, पुणे ४११ ०३०

■

॥ प्रथमावृत्ती ॥
२० मार्च १९९६ (गुढी पाडवा)

■





■

मूल्य : रु. ३०/-

■

॥ मुखपृष्ठ ॥
रमेश भारताल

■

॥ अक्षरजुळणी ॥
सौ. धनश्री ध. पुरोहित
टाइपो आर्टस्,
१४८१ शुक्रवार पेठ, पुणे ४११ ००२

■

॥ मुद्रक ॥
मा. गो. जोशी
आनंद मुद्रणालय
१५२३ सदाशिव पेठ, पुणे ४११ ०३०




# अं त रं ग

# श्री अधिकमास माहात्म्य कथासार



## अध्याय पहिला : सुख-संवाद

*"श्री गणेशायनम : श्रीसरस्वत्यैनम :।*
*श्रीगुरुभ्योनम : श्रीपुरुषोत्तमायनम : ॥"*

कोणत्याही कार्याच्या आरंभी श्रीगणेशाला वंदन करावे. त्यायोगे ते कार्य निर्विघ्नपणे पार पडते. कारण कर्ताकरविता तोच श्रीगणेश असतो. त्याची प्रार्थना करून 'अधिकमास माहात्म्य' या ग्रंथातील कथा साररूपाने सांगतो.

हा अधिकमास कोणता आणि त्याचे महत्त्व काय, याबद्दलचे शास्त्र सामान्य लोकांना सहज कळावे म्हणून ते कथारूपाने सांगितले तर त्याचा उमज सहज होतो, मनी बोध ठसतो. त्यांच्या हातून तसे धर्माचरण घडते आणि सर्वांचे कल्याण होते.

याच दृष्टीने महर्षी व्यासांनी पुराणांची रचना केली. त्या पुराणातील कथांचा सर्व लोकांवर चांगला परिणाम झाला आणि जगात धर्माचरण वाढले. शास्त्रापेक्षा रूढी बलवान ठरते. परंपरेने चालत आलेले धर्माचरण, व्रते, नियम, उत्सव, सण निष्ठापूर्वक केल्याने सर्व लोकांचे कल्याण होते.

महर्षी व्यासांनी संस्कृत भाषेत 'पद्मपुराण' नावाचा ग्रंथ लिहिला. त्यात अधिकमासाचे माहात्म्य वर्णन केले आहे. त्या ग्रंथाचे प्राकृत भाषेत अनेक लेखकांनी रूपान्तर केले. मराठी भाषेतही अनेक विद्वानांनी ओवीबद्ध 'अधिकमास माहात्म्य' ग्रंथ लिहिले आहेत. त्या अनेक ग्रंथांचे आधार हे कथासार सिद्ध केले आहे.

हे कथासार निष्ठापूर्वक वाचून किंवा शांतपणे श्रवण करून अधिकमासातील थोडी जरी व्रते केली, यथाशक्ती दान केले, तर भगवान पुरुषोत्तमाच्या कृपेने खचितच कल्याण होईल. आता ही कथा पाहा.

निमिष नावाच्या अरण्यातील शांत तपोवनात शौनक, गालव वगैरे अनेक ऋषिमुनी धर्मचर्चा करीत असत. अशा वेळी एकदा तेथे सूत नावाचे सर्वश्रेष्ठ पुराणिक आले. ते फार विद्वान होते.

त्या सूत पुराणिकांना ऋषींनी विचारले, "आम्ही धर्मचर्चा खूप करतो; परंतु ज्या धर्माचरणाने सामान्यजनांचे कल्याण होईल असे एखादे सोपे, सहजसुलभ व्रत, दान किंवा साधना असेल तर ती आपण सांगाल काय?"

सूत पुराणिक म्हणाले, "आपण मला जो प्रश्न केला तोच प्रश्न पूर्वी लक्ष्मीने भगवान नारायणाला केला होता. त्या वेळी नारायणांनी लक्ष्मीला जो उपाय सांगितला तीच त्यांच्या



सुखसंवादातील कथा मी आता सांगतो. ती शांतपणे ऐका."

या कलियुगात नरदेह प्राप्त होणे ही एक विशेष गोष्ट आहे. नरदेह मिळालेल्या प्राण्याला मात्र अनेक दुःखे, संकटे आणि व्यथा प्राप्त होत असतात. अशा वेळी तो भांबावून जातो. शरीराला, मनाला खरे समाधान, शांती, सुख कसे मिळेल याचा उपाय तो शोधीत असतो; परंतु त्याला मार्ग लवकर सापडत नाही!

इंद्रियसुखाच्या मागे लागून वाढत चाललेल्या आशा-आकांक्षा पुरविण्यातच त्याचा सारा वेळ निघून जातो. स्वार्थामुळे परमार्थ साधनेला त्याला वेळच मिळत नाही. सुख मिळविता येते; पण समाधान मिळणे फारच कठीण असते.

ते मनाचे, आत्म्याचे समाधान हेच खरे सुख असते, याचा उमज लवकर होत नाही. आणि म्हणूनच शास्त्रकारांनी धर्माचरणाचे, व्रतांचे, नियमांचे, स्नानदानांचे असे सोपे उपाय सांगितले आहेत. ते उपाय निष्ठापूर्वक, चिकाटीने केले पाहिजेत.

या धर्माचरणातसुद्धा सतत अडथळे येत असतात. संसारातील अनेक समस्या असतात. मायापाशाची अनेक बंधने आणि व्यवहारातील पेचप्रसंग यामुळे माणसाचे मन विषण्ण होते. शरीर, आत्मा मलिन बनतो. अशा वेळी शास्त्रकारांनी मलमासातील आचारधर्म पाळण्यास सांगितले आहे. ते जर श्रद्धापूर्वक पाळले तर सर्वांचे खचितच कल्याण होते.

लक्ष्मीनारायणांचा अशा प्रकारे सुखसंवाद चालू असता लक्ष्मी म्हणाली, "देवा, हा मलमास म्हणजे आहे तरी काय आणि त्यात कोणते आचारधर्म पाळले असता सर्व मानवांचे कल्याण होते याबद्दलची संपूर्ण माहिती मला सांगा!"

भगवान विष्णू म्हणाले, "ठीक आहे. ती माहिती खूपच विस्तृत

आहे. तथापि, साररूपाने तुला ती सारी सांगतो. ऐक!''

सूर्याच्या गतीवरून सौरवर्ष आणि चंद्राच्या गतीवरून चांद्रवर्ष अशा दोन्ही प्रकारची कालगणना या पृथ्वीवर चालू आहे; परंतु या दोन कालगणनेत दरवर्षी सुमारे अकरा दिवसांचा फरक पडतो. तो फरक दूर करून दोन-तीन वर्षांनी चांद्रमासात एका अधिक महिन्याची भर शास्त्रकारांनी घातली आहे.

हा अधिकमास म्हणजे दर तीन वर्षांनी एकदा येणारा; ह्या बारा महिन्यांत तेरावा एक असा विशेष महिना आहे. त्याचा महिमाही विशेष असाच आहे. कारण या महिन्यात सूर्य कोणत्याही राशीचे संक्रमण करीत नाही.

सूर्य प्रत्येक महिन्यात एका राशीचे संक्रमण करतो तर चंद्र प्रत्येक महिन्यात सत्तावीस नक्षत्रे भोगीत असतो. अशा रीतीने दरवर्षी त्यांच्या गतीत सुमारे अकरा दिवसांचा फरक पडतो आणि मग दर तीन वर्षांनी या कालगणनेचा मेळ घालण्यासाठी ज्या महिन्यात सूर्यसंक्रांत येत नाही तो विशिष्ट महिना अधिकमास म्हणून पाळला जातो.

सूर्यसंक्रांत नसलेल्या त्या चांद्र अधिकमासात वातावरणात विशिष्ट प्रकारचा बदल होतो. ग्रहणकाळाप्रमाणे वातावरण गढूळ, मलिन बनते म्हणून त्या महिन्याला 'मलमास' हे नाव दिले गेले. या मलमासात कोणतेही मंगलकार्य करू नये. फक्त पुण्यकृत्ये करावीत. त्यायोगे आपले आरोग्य आणि मानसिक समाधान टिकून राहते.

आपली प्रकृती आणि परिस्थिती पाहून प्रत्येक स्त्री-पुरुषाने या मलसातात कोणकोणती व्रते, नियम वगैरे पुण्यकर्मे यशाशक्ती करावीत ते आता थोडक्यात सांगतो. यातील एक जरी पुण्यकर्म



कळत नकळत घडले तरी त्याचे फळ चांगलेच मिळते.

या अधिकमासात दानाचे महत्त्व फार मोठे आहे. रोजच्या व्यवहारात माणूस आपल्यासाठी आणि कुटुंबातील आप्तेष्टांसाठी सारखा खर्च करीत असतो; परंतु त्याला ते दानाचे पुण्य लाभत नाही. म्हणून निदान या महिन्यात तरी सत्पात्री ब्राह्मणाला काही वस्तू, वस्त्र आणि अन्न दान दिले पाहिजे. ते दान प्रत्यक्ष भगवंताच्या चरणी अर्पण होत असते. कारण ब्राह्मण हे भगवंताचे मुख आहेत, असे पुराणान्तरी सांगितले आहे!

पूर्वी कृतयुगात ऋषिमुनी आणि ब्राह्मण पंडित अरण्यात तपोवनात राहून विश्वकल्याणाचे चिंतन करीत अनेक विज्ञानांचा शास्त्रांचा शोध लावीत, प्रयोग करीत. स्वतः राजेलोक त्या ठिकाणी जाऊन त्यांच्या उदरनिर्वाहाची काळजी घेत असत.

त्रेतायुगात मग ऋषिमुनी आणि पंडित ब्राह्मण राजवाड्यात स्वतः जाऊन राजाकडून आपल्या इच्छित कामना पूर्ण करून घेत असत. द्वापारयुगात राजेलोक मोठमोठ यज्ञसमारंभ करून त्यात ऋषिमुनी आणि विद्वान ब्राह्मणांना मुद्दाम निमंत्रणे करून बोलावीत आणि त्यांना भरपूर दाने देऊन त्यांच्या उदरनिर्वाहाची काळजी घेत.

आता मात्र या कलियुगात ब्राह्मणांनी आपला आचारधर्म सोडला. ब्रह्म जाणते विद्वान, निष्ठावान असे ब्राह्मण फारच थोडे राहिले. ऋषिमुनी तर अगदीच थोडे राहिले. अशा सदाचारी, निष्ठावान गुरु, ब्राह्मण, सुवासिनी यांना गृहस्थ पति-पत्नींनी मुद्दाम आपल्या घरी बोलावून त्यांची पूजा करून यथाशक्ती वस्तू, वस्त्र, अन्न दान करावे, मिष्टान्न भोजन देऊन विडादक्षिणा देऊन त्यांना बोळवावे.

अधिक महिन्यात ब्राह्मणपूजेचे आणि त्यांना दान देण्याचे

पुण्यकर्म जसे श्रेष्ठ आहे तसेच गाईची पूजा आणि गोदानाचेही महत्त्व अपार आहे. ते आता दुसऱ्या अध्यायात सांगितले आहे. नारायण लक्ष्मी यांचा हा सुखसंवाद दुसऱ्या अध्यायात दिला आहे तो ऐकावा!

●●●

## अध्याय दुसरा : गोमातेची सेवा

लक्ष्मी म्हणाली, "नारायणा, मागील अध्यायात तुम्ही मलमासाची माहिती दिली. त्या अधिकमासात काही पुण्यकर्मे करण्याचे महत्त्वही सांगितले. आपले आरोग्य आणि समाधान टिकविण्यासाठी यथाशक्ती व्रते, नियम करून ब्राह्मणाला, सुवासिनींनी दाने देण्याबद्दल कथन केले. परंतु अशी व्रते करण्यास किंवा दाने देण्यास जे लोक असमर्थ असतील त्यांनी या अधिकमासात काहीही खर्च न लागता करायचे असे काही नियम सांगा. ज्यांच्यामुळे अशक्त, दरिद्री अशाही लोकांना पुण्य मिळेल आणि त्यांना मन:शांती लाभून त्यांची प्रगती होईल!"

भगवान म्हणाले, "अशा दरिद्री, अशक्त किंवा असमर्थ लोकांनी अधिक महिन्यात दररोज पहाटेच लवकर उठून शक्य तर थंड पाण्याने नित्यनियमाने स्नान करावे. देवदर्शन, नामस्मरण आणि गोमातेला वंदन करावे. नंतर शक्य तो नक्तभोजन म्हणजे फक्त एक वेळच जेवण करावे. जेवणापूर्वी गाईला घास द्यावा.

"गोमातेच्या सेवेचे पुण्य फार असते. कारण गाईचे महत्त्व सर्व तीर्थांपेक्षा आणि सर्व देवांपेक्षा अधिक आहे. गोमयाने



सडासारवण केले तर ती भूमी अतिशय पवित्र बनते. तेथील वातावरण शुद्ध होऊन त्या घरी सुखशांती आणि समृद्धी नांदते.

"गाईचे दूध हे मातेच्या दुधाप्रमाणे पूर्णान्न आहे. गाईच्या शरीरात सर्व देवांचा निवास असतो. गाईचे मूत्र, शेण, दूध, दही, तूप या पंचगव्य प्राशनाने सर्व रोगांचे निवारण होते. तनामनाची शुद्धता होते.

अशा या गोमातेची सेवा स्त्री-पुरुषांनी सदा सर्वकाळ करावी; परंतु अधिकमासात जर ती नित्यनियमाने केली तर विशेष पुण्यकारक असून या उपायामुळे माणसाचे कल्याणच होते"

त्यानंतर लक्ष्मीदेवीने गंभीरपणे विचारले, "देवा, गोमातेची सेवा श्रेष्ठ आहे. गाय हा प्राणी अत्यंत पवित्र आहे; परंतु तिचे तोंड मात्र अपवित्र असते! ते असे का?"

भगवान म्हणाले, "देवी, त्याचे कारण म्हणजे तिला महादेवाने जो शाप दिला, त्याचा तो परिणाम झाला. ती हकीगत थोडक्यात सांगतो...!"

"एकदा मी आणि ब्रह्मदेव शंकराशी गप्पागोष्टी करीत होतो. बोलता बोलता ब्रह्मदेव अहंकाराने म्हणाले, "मी जर सृष्टी उत्पन्नच केली नाही तर विष्णू कोणाचे पालनपोषण करणार? आणि शंकर विनाश तरी कोणाचा करणार?"

शंकर हसून म्हणाले, "ते ठीक आहे. ब्रह्मदेवाला त्यामुळेच तिन्ही देवात नावाचा पहिला मान आहे! विष्णुभगवान म्हणजे किरीट, कुंडल, शंख, चक्र, गदा, वनमाला विभूषित लक्ष्मीपती आहेत. आमचे काय! स्मशाने निवास, डोक्यावर ही गंगा आणि आमचे मुकुटभूषण म्हणजे ही चंद्रकोर!"

"खरंच महादेवा, तुमचा मुकुट कुठे आहे?" सहज गमतीने

ब्रह्मदेवाने विचारले तेव्हा शंकर म्हणाले, "खरेच, की गंगावतरणाच्या वेळी आमचा मुकुट आम्ही जो काढून टाकला तो कुठे आहे याचा आम्हांला अजूनही ठावठिकाणा नाही! आपण दोघांनी जर आमचा मुकुट शोधून सापडून आणला तर फार उपकार होतील!"

झाले! शंभुदेवांनी त्यांचा मुकुट शोधायची कामगिरी आम्हां दोघांवर सोपविली. आम्ही त्या कामगिरीवर गेलो. लक्ष्मी, मग मी अतळ, वितळ, सुतळ, सप्तपाताळ हिंडलो तरी शंभुदेवांचा मुकुट मला काही दिसला नाही. मी थकलो, परत आलो. शंभुदेवाच्या चरणी मी माझी अगतिकता सांगितली. त्यांनी माझा सन्मान केला आणि स्वतः त्यांच्या शेजारी बसवून शांत होण्यास सांगितले.

तिकडे ब्रह्मदेवांनी एकवीस स्वर्ग धुंडाळले आणि आम्ही जेथे बसलो होतो तेथे ते ऐटीने येऊन म्हणाले, "सापडला ऽ शंभुरायाचा मुकुट सापडला!"

"खरेच की काय?" महादेव मोठ्या आश्चर्याने म्हणाले. त्यावर ब्रह्मदेव म्हणाले, "म्हणजे? मी काय खोटे सांगतो? पाहिजे तर ही पाहा गाय आणि केतकी साक्षीला आहेत! महादेवा, तुमचा मुकुट तो त्या तिथे पलीकडे..."

"थांबा! थांबा! तुम्हांला माझा मुकुट खरेच दिसला? काय हो गोमाता? तुम्ही पाहिला आहे तो माझा मुकुट?" महादेवांनी असे विचारताच बिचारी गाय मान हलवीत म्हणाली, "हं ऽम्या ऽऽ हं ऽम्या ऽऽ"

"खोटारडे ऽ, हंम्या हंम्या करून मान हलवतेस! खोटी साक्ष देतेस? माझ्या डोक्यावर प्रथमपासूनच मुकुट नाही. जे नाही ते तुम्ही पाहिले म्हणून सांगता! खोटे बोलता! याचा परिणाम म्हणजे ज्या तोंडाने या गाईने ही खोटी साक्ष दिली ते तिचे तोंड अपवित्र होईल. ती आपल्या तोंडाने घाण खाईल."



झाले! लक्ष्मी, महादेवाच्या त्या शापामुळे गाय सर्वांगी पवित्र असूनही कधीकधी ती आपले तोंड अपवित्र करते. विष्ठा खाते. तुझ्या शंकेचे निरसन आता झाले ना?"

"होय महाराज, या अधिकमासाचे महत्त्व आणि त्या महिन्यात करावयाची व्रते, दाने, नियम यासंबंधी मला आपण जी थोडी माहिती दिली ती मला खूप आवडली. तसेच, अशक्त, दरिद्री आणि सामान्य माणसानेही या महिन्यात जी काय साधी बिनखर्ची व्रते करावी, दररोजचे साधे नियम पाळून पुण्यकर्म करावे तेही समजले. देवब्राह्मण, संतसज्जन यांचा मान राखून गाय आणि तुळशीचे पूजन नित्यनेमाने करावे हेही आता पटले."

विष्णू म्हणाले, "आता पुढील अध्यायात श्रीमंत माणसांनी गाईची सेवा करावी आणि शक्य तितक्या गाई ब्राह्मणांना दान द्याव्यात याबद्दलची माहिती आणि एक कथाही मी तुला सांगणार आहे ती तू शांतपणे ऐक."

●●●

## अध्याय तिसरा : गोदान आणि पौलव्याची कथा

प्राचीनकाळी प्रत्येक राजाजवळ मोठमोठे गौळवाडे असत. गोधन ही राज्याची प्रतिष्ठा मानली जात असे. दुर्योधनाने विराट राजाचा गवळीवाडा लुटला; विराट राजाच्या गाई पळविल्या, त्या वेळी उभयपक्षात युद्धे झाली. वसिष्ठऋषींची कामधेनू

दिलीपराजाची गोसेवा यांच्या कथा प्रसिद्धच आहेत.

आजही काही श्रीमंतांजवळ पुष्कळ गाई असतात. अशा श्रीमंतांनी अधिकमासात ब्राह्मणांना गाईचे दान दिले तर ते महापुण्यकारक दान होते. दान घेणारे ब्राह्मण सत्पात्र आणि गाईचे संरक्षण करण्यास, गोपालनास समर्थ असेच असावे लागतात.

जी गाय दान द्यायची ती कशी असावी ते ऐक. ती गाय सुंदर, धष्टपुष्ट आणि सवत्स अशी असावी. भरपूर दूध देणारी, गरीब अशी गाय धार काढण्याच्या भांड्यासह, तिच्या गळ्यात घंटा बांधून, योग्य अशी शृंगारून, पुरुषोत्तम गोपालकृष्णप्रीत्यर्थ संकल्प करून ब्राह्मणास दक्षिणेसह द्यावी.

रोड, रोगी, वंध्या, लातरी (लाथ मारणारी), कमी किंमतीची, एकशिंगी, पान्हा चोरणारी, अशी गाय दान देणाऱ्या दात्याला पुण्य न मिळता उलट पापच लागते.

गाईच्या अंगात सर्व देवांचा निवास असतो. गाईच्या पंचगव्यात सर्व तीर्थे सामावलेली असतात. आणि म्हणूनच गोदान करणे हे सर्वांत मोठे पुण्यकर्म आहे! ज्यांना हे शक्य आहे त्यांनी अधिकमासात हे गोदान करून महापुण्य प्राप्त करावे.

भगवान विष्णूंनी गोदानाबद्दल ही माहिती दिली तेव्हा लक्ष्मीने विचारले, "गाईच्या अंगात सर्व देवांचा निवास कसा?" मग विष्णूंनी लक्ष्मीला त्याबद्दलची कथा पुढीलप्रमाणे सांगितली.

पूर्वी पौलव्य नावाचा एक महान तपस्वी ऋषी या पृथ्वीवर होता. त्याने इतकी कठोर तपश्चर्या केली, की त्याच्या त्या पुण्याईने त्याला इंद्रपद प्राप्त व्हावे अशी परिस्थिती निर्माण झाली.

मग देवेंद्राने विचार केला, की या पौलव्य ऋषीची तपश्चर्या भंग केली पाहिजे. त्यासाठी त्याने काही सुंदर अशा अप्सरांना त्या कामगिरीवर पौलव्याकडे थेट पाठवून दिले.



त्या अप्सरा पौलव्याच्या आश्रमात आल्या. नृत्यगायनाने त्यांनी पौलव्याच्या समाधीच्या भंग केला. दृष्टादृष्ट झाली आणि पौलव्य ऋषी रागावून म्हणाले, "तुमचा हा नखरा खरा नाही. हा नसता उद्योग करायला तुम्हांला कोणी सांगितले, ते खरे सांगाल तर ठीक, नाही तर मी तुम्हांला शापून भस्म करीन!"

त...त...प...प करीत त्या म्हणाल्या, "मुनिवर्य हे ऽ हे कृत्य प्रत्यक्ष देवेंद्राची आज्ञा ऽ म्हणून आम्ही ऽऽ"

"अस्सं! तर मग त्या देवेंद्राला मी जाळून भस्म करतो." असे म्हणून पौलव्यांनी हातात पाणी घेतले आणि मंत्र म्हणत प्रत्यक्ष देवेंद्रालाच पाचारण केले--- पण--- पण काही केल्या देवेंद्र तेथे येईना! कारण तिकडे इंद्राचे आसन डळमळले. इंद्राला हुडहुडी भरली. तो तेथून पळून ब्रह्मदेवाकडे गेला आणि म्हणाला, "पौलव्य ऋषींच्या शापापासून आमचे रक्षण करा!"

विष्णू म्हणाले, "देवेंद्रा, अरे, ऋषिमुनी, ब्राह्मण यांचा छळ करण्याची सवय आता सोडून दे! पूर्वी तुझ्या ह्याच खोडीमुळे तुझी सर्व संपत्ती गेली होती आणि ती पुनः मिळविण्यासाठी समुद्रमंथनाचा खटाटोप सर्व देवांना करावा लागला. आज आता पुनः त्या पौलाव्याचा राग----

तिकडे पौलव्यऋषी हातात पाणी घेऊन मंत्र म्हणत इंद्राला आवाहन करीत होते. तो लवकर येईना म्हणून त्यांनी अंतर्ज्ञानाने जाणून ब्रह्मदेवाला आणि शेवटी विष्णूसह सर्वांना शापाने भस्म करण्यासाठी आवाहन आरंभिले. ऋषींचा त्या वेळचा तो रुद्रावतार पाहून साऱ्या अप्सरा भयचकित होऊन तेथून पळून गेल्या.

"आता आली का पंचाईत! देवेंद्रा, तुमच्या ह्या

उपद्व्यापापायी ब्रह्मदेव गर्भगळीत झाले. मलाही कापरे भरले. बापरे ! आता चला महादेवांकडे ! कोणतेही अरिष्ट स्वत:वर झेलणारे तेच बलिष्ठ देव आहेत ! चला त्यांना शरण जाऊ ! '' असे बोलून ब्रह्मा आणि इंद्रासह विष्णू शंकराकडे गेले.

भोलेनाथ रामनाम जप करीत शांत बसले होते. तोच ' ॐ नमः शिवाय ऽ ' असा घोष त्यांना ऐकू आला. ते तिघे त्यांना दिसले. येण्याचे कारण विचारले आणि त्यांचे बोलणे चालू असतानाच स्वत: शंकर भगवानांना कापरे भरले. भांग प्याल्यासारखे ते असंबद्ध बडबडू लागले. '' अनर्थ झाला ऽ मला काहीच सुचेना ऽ कोण ? काय ? ''

विष्णू चकित होऊन म्हणाले, '' पाहिलेस ना द्रेवेंद्रा, तुझ्या ह्या ऋषि-ब्राह्मण छळाच्या कारस्थानामुळे आम्ही तिन्ही देव संकटात सापडलो आहोत. स्वत: हे भोलेनाथ महादेव असून तेही गडबडून गेले आहेत पाहा ! ऋषिब्राह्मणांचा राग मोठा कठीण असतो ! अरे स्वत: मी ब्राह्मणाची लाथ माझ्या छातीवर झेलली होती. ''

शंकर म्हणाले, '' ते सारे जाऊ द्या ! आता या अशा वेळी काय उपाय करावा ते सांगा. नीट विचार करा ! '' विष्णू म्हणाले, '' आता एकच उपाय आहे ! आपण सारे देव गौतमीच्या अंगात शिरू आणि निर्भय होऊ. कारण ऋषिब्राह्मणांचा राग गाईवर मुळीच चालत नाही. '' तो विचार साऱ्यांना पटला आणि सारे देव मग पटापट गाईच्या शरीरात शिरले. साऱ्या तीर्थांनीही मग गाईचा आश्रय घेतला. ते जाणून पौलव्य मुनी खट्टू झाले. त्यांचा नाइलाज झाला. सारा उपायच खुंटला. गोमातेला नमस्कार करून ते शांत झाले.

●●●



## अध्याय चौथा : कर्मफळाची कथा

विष्णू म्हणाले, '' लक्ष्मी, पौलव्याची कथा आणि गोदानाचे महत्त्व तुला मागील अध्यायात सांगितले. आता या अधिकमासात यशाशक्ती पुण्यकर्मे करून काहीतरी वस्तू, वस्त्र, अन्न आणि पात्र वगैरे जे दान द्यायचे ते ब्राह्मणास, जावयास दिल्याने मोठे पुण्य लाभते. माणसाने आपल्या पारलौकिक कल्याणासाठी अधिकमासात भगवान पुरुषोत्तमाप्रीत्यर्थ काही तरी दान देऊन व्रत केले पाहिजे. नाही तर केल्या कर्मांचे फळ आहेच !

दान घेणारा ब्राह्मण सुशील, संतुष्ट आणि नेहमी समाधानी असा असावा. तो आपल्या धर्माचरणात पारंगत असावा. केवळ दुसऱ्याच्या द्रव्याची इच्छा करून आशाळभूतपणे वागणारा असा नसावा. सदाचारी, सद्विचारी आणि सतत संयमाने वागून दुसऱ्याचे कल्याण इच्छिणाऱ्या अशा तेजस्वी ब्राह्मण किंवा संतसज्जन यांना अधिकमासात आवर्जून निमंत्रण देऊन त्यांना सन्मानाने दान द्यावे.

व्याजाच्या आशेने दुसऱ्यांना धन देणारा एक सावकार, त्याच्यापासून कर्जाऊ रक्कम घेऊन ती परतफेड न करणारा एक कर्जदार आणि त्या कर्जदाराला जामीन राहूनही सावकाराला ती रक्कम न देणारा असा एक जमीनदार या तिघांच्या मृत्यूनंतर घडलेली एक कथा मी तुला आता सांगतो.

एकदा एक प्रवासी ओढ्याकाठी झाडाला घोडा बांधून विश्रांतीसाठी थांबला. त्याने आपले चंबूगबाळे झाडाच्या बुंध्याजवळ ठेवले. ओढ्यात थंड पाण्याने आंघोळ केली. शिदोरी

सोडली. भाकरी खाल्ली आणि थोडी डुलकीही घेतली.

तेवढ्यात झाडावरील एका माकडाने त्या प्रवाशाच्या चंबूगबाळातील एक लहानसे गाठोडे पळविले. ते प्रवाशाला कळलेही नाही. थोड्या वेळाने तो प्रवासी परत घोड्यावर बसला आणि आपल्या पुढील मार्गावर निघून गेला.

प्रवासी निघून गेल्यावर दुसरा एक माणूस तेथे आला. त्याने हातपाय धुतले. ओढ्याचे थंडगार पाणी तो प्याला आणि विश्रांतीसाठी झाडाखाली बसला, तोच काय नवल!

झाडावरील माकडाने पहिल्या प्रवाशाचे जे गाठोडे पळविले होते ते सोडून पाहताना माकडाच्या हातून ते निसटले आणि त्या दुसऱ्या माणसाच्या मांडीवर पटकन पडले.

हे काय ? तो माणूस आश्चर्याने पाहू लागला ! बापरे ! सोनेनाणे ? दैवाची विचित्र लीला ! देवाची देणगी ! त्याने झाडावर पाहिले. ते माकड वाकुल्या दाखवीत पळून गेले. मग त्या माणसाने इकडे तिकडे बारकाईने पाहिले तर तेथे कोणीच नाही ! झटकन त्याने ते गाठोडे धोतरात बांधले आणि तो पटकन तेथून दूर निघून गेला.

तेवढ्यात तिसरा एक इसम त्या ओढ्यावर आला. त्याने आंघोळ केली. तो भाकरी खात शांतपणे बसला. मग तो पहिला घोडेस्वार प्रवासी दौडत दौडत तेथे आला. धापा टाकीत घाबरेपणाने त्याने त्या भाकरी खाणाऱ्या इसमाला विचारले, "काय हो, माझे एक गाठोडे इथे पडले होते ते तुम्ही पाहिले काय ? घेतले असले तर ते देऊन टाका. थोड्या वेळापूर्वीच मी येथे----"

"नाही बुवा ! कसले गाठोडे ? ते मी कशाला घेऊ ? काय होतं त्या गाठोड्यात ? अन् ते तुम्ही इथे कशासाठी हो ठेवले होते ?" तोंडात घास घोटाळवीत तो इसम बोलत होता.



"अरे चोरा, मलाच प्रश्न विचारतोस ? अरे लबाडा, त्या गाठोड्यात माझी बारा वर्षांची कमाई होती. सोनेनाणे... थोड्या वेळापूर्वीच मी इथे विश्रांती घेत पडलो होतो आणि मग चंबूगबाळे आवरण्याच्या घाईत ते माझे गाठोडे इथेच पडले... कोसभर दूर गेल्यावर माझ्या ते लक्षात आले ! मग मी परत इथे आलो. पाहतो तर तूऽ ! ते काही नाही ! माझे ते गाठोडे तूच घेतले आहेस ! बऱ्या बोलाने ते माझे मला परत दे ! नाही तर बघ ! जीवच घेईन तुझाऽऽ !" घोडेस्वार असा हातघाईवर येऊन त्या इसमाला दम देत होता.

भाकरी खात बसलेला इसम त्या घोडस्वाराला गयावया करून सांगत होता, "नाही हो, मी तुमचे कसले गोठोडे ते मुळीच पाहिले नाही. माझा झाडा घ्याऽऽ"

"झाडाला बांधून चोप देईन ! जीव घेईन तुझा ! माझे धनाचे गाठोडे तूच घेतले आहेस ! कुठे तरी ते लपवून ठेवले असशील ! देतोस, की नाही बोल ? नाही तर..." तो प्रवासी त्या इसमाच्या अंगावर धावून गेला. त्याने त्या इसमाच्या मानेला विळखा घातला.

मग मात्र तो इसम उठला. त्या दोघांची झटापट चालू झाली. आरडाओरडा, शिवीगाळ. सारे रान गर्जले. घोडा खिंकाळू लागला. झाडावरील माकडे चीं चीं करून उड्या मारू लागली. एकच गोंधळ उडाला.

"मेलो मेलोऽऽ देवा, धाव रेऽ देवा, धाव रेऽ मेलोऽऽ तो इसम किंकाळ्या फोडीत होता. घोडेस्वार प्रवासी त्या इसमाचे नरडे दाबत होता, "दे माझे धन ! दे माझे धन !"

नेमके त्याचे वेळी आकाशामार्गे नारदमुनींची स्वारी तेथून चालली होती. त्यांनी आश्चर्याने तो सारा देखावा पाहिला. त्यांना

त्या ओरडणाऱ्या इसमाची खूप दया आली! तो देवाला हाक मारीत होता, "देवा, धाव रेऽऽ" पण देव कुठे होता!

नारदमुनी लगबगीने थेट वैकुंठात आले. त्यांनी मला (विष्णूला) ओढ्याच्या काठावरील तो सारा प्रकार सांगितला आणि ते म्हणाले, "प्रभू, तुम्ही दीनांचे कैवारी आहात ना? त्या आडदांड राक्षसाने भाकरी खात बसलेल्या गरीब इसमाचा गळा धरला आहे! तो इसम तुमचा धावा करतो आहे आणि तुम्ही? तुमची दया, क्षमा, शांती कुठे गेली आहे?"

मी हसून म्हणालो, "नारदा, अरे करावे तसे भरावे या न्यायाने त्या ओढ्याकाठी तो तसा प्रकार चालला आहे. त्या बाबतीत मी काहीच करू शकत नाही. जे होत आहे ते व्हायलाच पाहिजे होतं! पूर्वजन्मीचा त्यांचा तो खेळ आहे."

मग विष्णूंनी नारदाला त्या गोष्टीचा उलगडा केला. तो असा:

त्या ओढ्याच्या काठावर मधेच आलेला तो दुसरा प्रवासी म्हणजे पूर्वजन्मीचा तो एक सावकार होता. तिसरा भाकरी खात बसलेला गरीब इसम हा पूर्वजन्मीचा कर्जदार होता आणि जो पहिला घोडेस्वार प्रवासी तो पूर्वजन्मी या गरीब इसमाचा जामीनदार होता.

सावकार मध्येच आला. त्याने कर्जाऊ दिलेली पूर्वजन्मीची रक्कम त्याची त्याला सहजच मिळून गेली. अचानक धनलाभ झाला. त्याला खूप आनंद झाला. तो तिसरा गरीब इसम त्याच्याने पूर्वजन्मी सावकारापासून कर्जाऊ घेतलेली रक्कम परत फेडता आली नाही. म्हणून त्याला या जन्मी असा भरपूर मार खावा लागला.

आता तो घोडेस्वार प्रवासी पूर्वजन्मीचा त्यांचा जामीनदार, त्याला याच जन्मी बारा वर्षे कमाई करून धनाचा साठा करून त्या सावकाराची रक्कम अशा रीतीने भरून द्यावी लागली. तो त्या



गरीब कर्जदाराला मारणारच!

तेव्हा नारदा, ही ज्याच्या त्याच्या कर्मफळाची कथा आहे. यामध्ये देव आणि दैव काहीच करू शकत नाहीत! आणि विशेष म्हणजे या जन्मीचे ते तिघेही वाटसरू पूर्वजन्मी ब्राह्मण होते म्हणून म्हणतो, की

ब्राह्मणांनी दुसऱ्याला धन देऊन व्याजाची आशा धरू नये. दुसऱ्यापासून कर्जाऊ का होईना द्रव्य घेऊ नये आणि फुकटचा मोठेपणा म्हणून कोणाला जामीन राहू नये!

सदाचारी, संतुष्ट आणि समाधानी असेच ब्राह्मण दान देण्यास आणि घेण्यास पात्र ठरतात. अशा ब्राह्मणांना, संतसज्जनांना किंवा जावयाला दान देणे म्हणजे अधिकमासातील मोठेच पुण्यकार्य आहे!

स्वतःचा आचारधर्म पाळून कठोर तपश्चर्या करणाऱ्या पौलव्य ऋषीच्या देवसुद्धा भ्याले. त्यांनी गाईच्या शरीरात प्रवेश केला म्हणून या अधिकमासात देवांपेक्षाही ऋषी, ब्राह्मण, संतसज्जन आणि गोमाता यांना फार महत्त्व दिले आहे! यासंबंधी नृगराजाची कथा आता पुढे पाचव्या अध्यायात वाचावी!

● ● ●

## अध्याय पाचवा : नृगराजाची कथा

भगवान विष्णू म्हणाले, "लक्ष्मी, अशाप्रकारे सर्व देव आणि तीर्थे गाईच्या शरीरात असल्यामुळे गाय हा प्राणी अति पवित्र बनला. पौलव्य ऋषीने शांत होऊन गाईची पूजा केली आणि आपल्या

आश्रमात त्याने नंतर अनेक गाई पाळल्या.

ज्ञानी ऋषींच्या रागापुढे देवांचेही काही चालत नाही. मग मानवाची काय कथा! गोदान करण्यात घडलेल्या अपराधामुळे आणि ब्राह्मणाच्या रागामुळे पूर्वी नृग नावाच्या एका राजाला शिक्षा भोगावी लागली. ती कथा अशी :

पूर्वी नृग नावाच्या राजाने अधिकमासात एक गाय ब्राह्मणाला दान दिली. ती गाय त्या ब्राह्मणाच्या घरातून रात्री निसटून परत नृगराजाच्या गोशाळेत आली.

दुसऱ्या दिवशी राजाने योगायोगाने चुकून तीच गाय दुसऱ्या ब्राह्मणाला दान देऊन टाकली. तो ब्राह्मण त्या गाईला घरी नेत असता वाटेत पहिल्या ब्राह्मणाने ती गाय ओळखली. तो म्हणाला, "काय रे चोरा, नृगराजाने मला काल दान दिलेली ही गाय तू चोरून चालविलीस काय ?"

"छे! छे! मी तुझी गाय कशाला चोरीन ? अरे, ही गाय मला नृगराजानेच आज दान दिलेली आहे. ही गाय माझी आहे!" तो दुसरा ब्राह्मण खूपच रागावला आणि म्हणाला, "नाही. नाही. ही गाय माझीच आहे. मी ओळखली आहे. रात्री ही माझ्या गोठ्यातून पळून गेली. तीच तू चालविली आहेस! सोड. सोड ही माझी गाय!"

अशा रीतीने त्या एका गाईबद्दल दोन ब्राह्मणांत खूपच जोराचे भांडण चालले. वाटेत बघ्या लोकांची ही गर्दी जमली. ती वर्दी थेट नृगराजापर्यंत पोहोचली. मग नृगराजा स्वत: तेथे आला. त्याने त्या दोन्ही ब्राह्मणांना ओळखले आणि ती गायही ओळखली.

मग नृगराजाच्या लक्षात आले, की आपल्या हातून ही एकच गाय या दोन ब्राह्मणांना दान दिल्याची चूक झाली आहे. आता त्या अपराधाबद्दल करणार तरी काय!



नृगराजाने आपल्या हातून न कळत घडलेल्या त्या अपराधाबद्दल दोन्ही ब्राह्मणांजवळ क्षमा मागितली; पण छे! ते दोघेही नृगराजावर खूपच रागावले.

प्रत्येक जण म्हणाला, "हीच गाय माझी आहे!" त्यांचे भांडण काही आवरेना. राजा म्हणाला, "ही गाय आता फक्त एकजणानेच घ्यावी. दुसऱ्याला मी दुसऱ्या दोन गाई देतो अथवा तिच्या मोबदल्यात भरपूर द्रव्य देतो."

पण काही केल्या ते दोघेही ऐकेनात! ते हट्टाला पेटले. शेवटी पहिल्या ब्राह्मणाने आडदांडपणाने दुसऱ्या ब्राह्मणाला भररस्त्यात सर्वसमक्ष चांगलाच चोप दिला आणि तो ती गाय घेऊन घरी गेला.

दुसऱ्या ब्राह्मणाने विव्हळत राजाला शाप दिला. पुढे कालान्तराने नृगराजा मरण पावला. यमराजाने त्याला सरड्याचे रूप देऊन अरण्यातील एका कोरड्या विहिरात ढकलून दिले. तेथे तो नृग-सरडा दुःख भोगीत राहिला.

श्रीकृष्णाची सांब, प्रद्युम्न वगैरे मुले एके दिवशी खेळत खेळत त्या विहिरीजवळ आली. त्यांनी विहिरीतील तो भला मोठा सरडा तडफडत असलेला पाहिला. त्यांना त्याची दया आली. त्यांनी सरड्याला वर काढण्याचे प्रयत्न केले; पण त्यांना ते जमेना. मग स्वत: श्रीकृष्ण तेथे आले.

श्रीकृष्णाने त्या सरड्याला वर काढले, तोच काय नवल! त्या सरड्याचे रूपान्तर एका दिव्य पुरुषात झाले. तो दिव्य पुरुष म्हणाला, "श्रीकृष्णा, तुम्ही आज माझा हा उद्धार केलात. मी नृगराजा पूर्वजन्मात गोदानात चुकून ब्राह्मणांचा राग मी ओढवून घेतला, त्यामुळे सरडा होऊन येथे पडलो होतो. आता मी सुखाने

स्वर्गात जातो!''

विष्णू म्हणाले, ''लक्ष्मी, असे आहे माहात्म्य त्या गोदानाचे! ब्राह्मण, ऋषी, देव यांच्या रागाचा परिणाम म्हणून पौलव्याची आणि नृगराजाची कथा तू ऐकलीस. आता पुढे सहाव्या अध्यायात दीपपूजा आणि दीपदान यांची माहिती तसेच, आणखी एक कथाही तुला सांगतो ती ऐक!''

●●●

## अध्याय सहावा : दीपपूजा-दीपदान

श्रीलक्ष्मीने विचारले आणि नारायणांनी सांगितले, की अधिकमासात दीपपूजा करणे आणि सत्पात्री ब्राह्मणाला दीपदान करणे हे कृत्य फारच पुण्यकारक आहे. या दानामुळे माणसाची सर्व पातके दूर होतात. मनाला उत्साह येतो. आयुरारोग्य, संतति-संपत्ती, सुख-शांती आणि समाधान प्राप्त होते. दिव्याला दररोज नियमाने मनापासून नमस्कार जरी केला तरी ती सर्व फळे प्राप्त होतात.

ज्या दिवशी अधिकमासात दीपदान करायचे त्या दिवशी प्रात:काली लवकर उठून शक्य तर थंड पाण्याने स्नान करावे. तीर्थस्नान घडेल तर फारच उत्तम होय. नंतर नेहमीप्रमाणे देवपूजा करून एका स्वच्छ जागेवर पाट किंवा चौरंग मांडावा. आरास करावी.

चौरंगावर किंवा पाटावर धान्यराशी ठेवावी. त्या राशीवर (पाण्याने भरलेला) कलश मांडावा. त्या कलशावरील पात्रात



तांब्याचा किंवा धातूचा दिवा तूपवातीसह प्रज्वलित करून ठेवावा.

नंतर श्रीगणेश, पुरुषोत्तम, राधिकेसह श्रीकृष्ण यांची आणि त्या दिव्याची पूजा षोडशोपचारे करावी. तो दीप ब्राह्मणाला दान देऊन टाकावा. त्या ब्राह्मणाला यथाशक्ती वस्त्र, पात्र, अन्न, शिधा-मिष्टान्न भोजन आणि तांबूल-विडा, दक्षिणा देऊन नमस्कार करावा.

त्या दिवशी आप्तेष्टांना पुरणाच्या धोंड्याचे भोजन घालावे. जावयाचा सत्कार करावा. जावयाला किंवा ब्राह्मणाला, तुपात तळलेले धोंडे किंवा तीस तीन अनारसे दान द्यावेत. बत्तासे, खारका, सुपाऱ्या फळे हे सुद्धा तीस तीन या संख्येतच दान करावे.

पूर्वी अधिकमासात गोदान, भूदान, हिरण्यदानं वगैरे मोठमोठी दाने महिनाभर दररोज देत असत; पण त्यासर्व दानांपेक्षाही दीपपूजा आणि दीपदानाचे महत्त्व अपार आहे. मग दीपपूजेची एक लहानशी कथाही नारायणांनी सांगितली. ती अशी:

पूर्वी सरस्वती नदीच्या तीरावर एका आश्रमात सुशर्मा नावाचा एक गृहस्थ राहात होता. भिक्षा मागून तो आपला उदरनिर्वाह करीत असे. तथापि, गृहस्थाश्रमातील सर्व कर्तव्ये तो पाळीत असे. सदासमाधानी राहणाऱ्या, सदाचारी, विचारी स्त्री-पुरुषांवर भगवान पुरुषोत्तम सदैव संतुष्टच राहतो.

सुशर्म्याचा नित्यकर्म चालू असता अधिकमास आला. या महिन्यात विशेष व्रते, दाने करावीत; परंतु तितके सामर्थ्य सुशर्म्याला नव्हते. मग त्याने विचार केला आणि फक्त एकवेळ भोजन (नक्त) आणि तेही मौन पाळून सोपे व्रत करावे.

'अधिकमास माहात्म्य' ग्रंथाचे वाचन, श्रवण, मनन करून अखंड प्रज्वलित असा नंदादीप लावायचा. दररोज दीपपूजा

करायची आणि मग एके दिवशी ब्राह्मणाला दीपदान द्यायचे. एवढाच नियम आणि दान करावे.

झाले! त्याप्रमाणे त्यानें व्रत आणि नियम चालू ठेवले. त्यामुळे भगवान पुरुषोत्तम सुशर्म्यावर प्रसन्न झाले. त्यामुळे त्याला सदैव सुख, शांती आणि समाधान लाभले.

अधिकमासातील कृष्ण एकादशीची रात्र होती. सुशर्म्याने रात्रभर जागरण केले. देवाजवळच्या नंदादीपाच्या प्रकाशात त्याने 'अधिकमास माहात्म्य' ग्रंथवाचन केले. "आता उद्या द्वादशी! द्वादशीच्या दिवशी निष्ठावान ब्राह्मणाला बोलावून त्याच्याकडून दीपपूजा यथासांग करावी आणि दीपदान विधिपूर्वक द्यावे." असा विचार करून तो भल्या पहाटेच नदीवर स्नानासाठी गेला.

तेवढ्यात काय गडबड झाली, देवाजवळील त्या नंदादीपाजवळ एक उंदीर आला. दिव्याची वात मंद झाली होती. वातीवर काजळी आली होती. ती वात पळविण्याचा त्या उंदराचा बेत होता; परंतु कोपऱ्यात एक मांजर लपून बसले होते. उंदीर हळूहळू दिव्याजवळ आला, तोच त्या मांजराने उंदरावर झडप घातली आणि आपले भक्ष्य बरोबर टिपले. या धरपकडीच्या धडपडीत एक मात्र अगदी विशेष गोष्ट सहजासहजी घडून आली.

मांजराने उंदरावर उडी घेताच तिचा धक्का सहजच त्या नंदादीपाला लागला. दिव्यावरील काजळी झटकली गेली. वात थोडी पुढे सरकली आणि तो दिवा पहिल्यापेक्षा अधिकच प्रकाशमान झाला.

सुशर्म्याने स्नान केले आणि घरी येतानाच तो एका ब्राह्मणाला बरोबर घेऊन आला. देवघराजवळ येताच त्या दोघांनी नंदादीपाचा तो लख्ख प्रकाश पाहिला. त्याचे डोळे दिपले. "अहाहा! काय ही भगवंताची लीला! आज माझ्या दीपदानाचा सुयोग! हा आगळा तेजस्वी प्रकाश! भगवान पुरुषोत्तम प्रसन्न झालेले दिसतात!"



असा आनंद प्रदर्शित करून सुशर्म्याने ब्राह्मणाकडून यथासांग दीपपूजा सांगून घेतली. त्यानंतर त्याने निष्ठापूर्वक ते दीपदान ब्राह्मणाला दिले. सारा विधी आटोपून ते दोघे अंगणात आले तर काय आश्चर्य!

ते मांजर अंगणात मरून पडले होते. सुशर्मा आणि ब्राह्मण त्या मांजराच्या देहाकडे पाहात विचार करीत होते. तेवढ्यात आकाशातून एक दिव्य विमान तेथे आले. विमानातील देवदूतांनी ते मांजर उचलून विमानात ठेवले आणि सुशर्म्यापुढे हात जोडून नम्रपणाने ते देवदूत म्हणाले, "चला महाराज, विमानात बसा!"

या मांजराच्या हातून रात्री नकळत दीपपूजा घडली म्हणून त्याचा उद्धार झाला आणि आपण सतत या अधिकमासात दीपपूजा केली, आज आपण दीपदान दिले, या पुण्याईमुळे तुम्हांला भगवान पुरुषोत्तमाने हे विमान पाठवून थेट गोलोकात मानाचे स्थान दिले आहे!"

नंतर तो सुशर्माही विमानात बसला. ते विमान आकाशमार्गे निघून गेले. ब्राह्मण आ करून पाहात राहिला.

विष्णू म्हणाले, "लक्ष्मी दीपपूजा आणि दीपदान यांचे अधिकमासातील हे असे श्रेष्ठ फळ मिळत असते. आता पुढील सातव्या अध्यायात मी तुला दीपविध्वंसनाची एक कथा सांगणार आहे, ती तू चित्त देऊन ऐक!"

●●●

## अध्याय सातवा : सुशीला आणि विमला

पूर्वी मधुवनात शाकली नामक एक गृहस्थ होता. त्याला दोन बायका होत्या. थोरली सुशीला ती नावडती. तिला मूलबाळ नव्हते. धाकटी विमला ती आवडती होती.

एके दिवशी सुशीला पहाटेच नदीवर स्नानासाठी गेली. त्या दिवशी नदीवर खूप लोक स्नानासाठी आले होते. कधी नव्हे इतकी गर्दी झाली होती. ती गर्दी पाहून सुशीलेला आश्चर्य वाटले.

घरी आल्यावर तिने आपल्या पतीला त्या गर्दीबद्दल विचारले तेव्हा शाकली म्हणाला, "अग वेडे, आजपासून अधिकमहिना सुरू झाला आहे. या महिन्यात स्नान-दान, व्रते, नियम जर केले तर आपले मनोरथ पूर्ण होतात. खूप पुण्य लाभते. आयुष्याचे सार्थक होते. दर तीन वर्षांनी एकदा हा अधिकमासातील येत असतो."

सुशीला मनात म्हणाली, "बरे झाले! आज पहाटेच आपल्याला अनायासेच ही अधिकमासातील पाहिली पर्वणी साधली. आता महिनाभर हे स्नानाचे व्रत करीन." तिने पतीला आणखी विचारले, "महाराज, या महिन्यात करता येईल असे एखादे व्रत मला सांगाल काय?"

मग शाकलीने तिला दीपपूजा आणि दीपदानाचे व्रत करण्यास सांगितले. त्या व्रताचा नियम आणि विधी नीट समजावून सांगितला. त्याप्रमाणे सुशिलेने नियमाने ते दीपपूजेचे व्रत सुरू केले.

देवघराजवळील पवित्र जागेवर तिने एक कलश मांडला. त्यावर एक मोठा दीप स्थापन केला. तो दीप अखंड तेवत राहावा म्हणून तिने काळजी घेतली. ती नियमाने दीपपूजा करू लागली. तिला



प्रसन्नता प्राप्त झाली. दिवा सारी रात्र जळावा म्हणून झोपताना ती तो दिवा तुपाने गच्च भरून ठेवी. मोठी वात सरसावून ठेवी. अशा प्रकारे अखंड तेवत राहणाऱ्या नंदादीपाला नमस्कार करून ती रात्री शांत-निवांत झोपत असे!

सुशीलेचा तो दिवा सारी रात्र जळत होता; पण तो पाहून धाकटी विमला मनात जळू लागली. कारण नावडत्या सुशिलेने ते व्रत केल्यावर तिच्या मनातील इच्छा देवाच्या कृपेने पूर्ण होतील. तिला पुत्र होतील. ती आवडती होईल. मग आपला भाव कमी होईल!

सवतीच्या त्या दीपपूजेच्या व्रतात विघ्न कसे आणता येईल, याचा विचार ती धाकटी विमला रात्रंदिवस करू लागली. मग तिने तो विचार प्रत्यक्ष कृतीतही आणला.

एके दिवशी रात्री विमला हळूच उठली. तिने तो दिवा तोंडाने फुंकर घालून विझवला आणि ती गुपचूप झोपली. पहाटेच सुशीला उठली. दिव्याला नमस्कार करायला गेली तरी तो दिवा विझलेला! "अगं बाई! दिवा कसा विझला? वारा आला असेल, त्यामुळे हे घडले असले!" असे म्हणून तिने तो दिवा पुन: लावला. दिव्याला आणि देवाला तिने नमस्कार केला आणि ती नदीवर स्नानाला गेली.

दोन-चार दिवसांनी पुन: तसाच प्रकार घडून आला. पहिल्या वेळी तिने दिव्याला कोठूनही वारा लागू नये. वाऱ्याने तो दिवा मालवू नये म्हणून चांगलाच बंदोबस्त केला होता; पण आज त्या दिव्याची वात मागे जाऊन पडली होती. "अगं बाई! हा प्रताप उंदराने केलेला दिसतो!" असे म्हणून तिने ती वात पुढे सरसावली आणि दिवा पुन: तेवत ठेवला.

पुन: दोन-चार दिवसांनी सुशीला पहाटेच उठून पाहते तर आता

तो दिवा कलशावरून कलंडून खाली पडलेला! "अगं बाई! आज हा मांजरीने दिवा पाडला की काय?" असे म्हणून तिने तो दिवा पुन: उचलून नीट मांडला. तेवत ठेवला.

नंतर दोन-चार दिवसांनी पहाटेच उठून पाहाते तर दिव्यातले सारे तूप संपलेले आणि दिवा पुन: विझलेलाच! "अगं बाई हे काय? मी तर झोपताना हा दिवा तुपाने गच्च भरून ठेवला होता. रोज भरून ठेवते ते रात्रभर पुरते. मग आजच हे तूप कसे संपले?" तिने मग नीट निरखून पाहिले तर थोडे तूप जमिनीवर सांडलेले आणि थोडे तूप भांड्याजवळ पडलेले!

सुशिलेला मग मात्र संशय आला. रात्रीच हा दिवा विझून जाण्याचे जे प्रकार घडले ते कोणीतरी मुद्दाम केलेले विघ्नच आहे. वारा नाही, उंदीर नाही, मांजर नाही. मग हे विघ्न? माझ्या व्रताचा भंग करण्याचे कारण? कोणी बरे हे केले असेल? तिची खात्रीच झाली. सवत विमलाच आडवी आली; पण बोलणार कशी? उगाच आकांडतांडव करील ती आणि मग भांडण! पतिदेवांना त्रास! छे! छे! त्यापेक्षा मौनच चांगले!

असा विचार करून बिचारी सुशीला गप्पच राहिली. तिने पुरुषोत्तम भगवानाची प्रार्थना केली, "देवा, माझ्या ह्या दीपपूजेच्या व्रतात अडथळे आले तरी पण आपण कृपा करा. या व्रताचा भंग करणाऱ्या माझ्या विमलेलाही क्षमा करा!"

कितीही अडथळे आले तरी सुशिलेने महिनाभर ते दीपपूजेचे व्रत अखंड चालू ठेवले. महिन्याच्या शेवटी तिने ब्राह्मणाला बोलावून त्या व्रताचे यथाविधी उद्यापन केले. दीपपूजा करून दीपदान दिले.

त्या व्रताच्या पुण्याईने सुशिलेला हळूहळू नवे तेज प्राप्त झाले. तिचे सौंदर्य आगळ्याच तेजाने खुलू लागले आणि त्या व्रतात



अडथळे आणणारी, दीपपूजेत खुलू लागले आणि त्या व्रतात अडथळे आणणारी, दीपपूजेत विघ्न करणारी सवतीमत्सराने मनात जळणारी ती धाकटी विमला मात्र हळूहळू झिजत चालली.

विमला मनात कुढत होती. अंत:करणात जळत होती. ती आजारी पडली. तिची दृष्टी मंद झाली. ती रातांधळी बनली आणि कालान्तराने ती मरण पावली. सुशीलेला खूप दु:ख झाले. शाकलीलाही खूप वाईट वाटले; पण----पण कोण काय करणार!

मृत्यूनंतर त्या विमलेला खूपच यमयातना भोगाव्या लागल्या. नंतर तिला अनेक नीच योनीत जन्म घेऊन दु:खे भोगावी लागली आणि दीपपूजा, दीपदान व्रताच्या पुण्याईची त्या सुशीलेचे कल्याण झाले. भगवान विष्णू म्हणाले, "लक्ष्मी, अशा प्रकारे दीपव्रताचे माहात्म्य सर्वश्रेष्ठ आहे. पुरुषोत्तमाला दीपपूजा फारच प्रिय आहे."

"आता या पुढील आठव्या अध्यायात तुला मी नामस्मरण व्रताचा महिमा आणि त्यासंबंधी एक कथा सांगणार आहे, ती तू ऐक."

●●●

## अध्याय आठवा : नामस्मरणाचा महिमा

लक्ष्मी म्हणाली, "नारायणा, या जगात काही माणसे अशी असतात, की गरिबीमुळे त्यांना अधिकमासातसुद्धा कसलेही दान देणे अशक्य असते. काही माणसे अशीही असतात, की कामधंद्यामुळे त्यांना अधिकमासातसुद्धा कोणतेही व्रत किंवा नियम

पाळता येत नाही आणि अशीही काही माणसे असतात, की त्यांना आजारपण किंवा अशक्तपणा यामुळे या अधिकमासात काहीही-स्नानसुद्धा करता येत नाही, अशा माणसांनी कोणते पुण्यकर्म करावे ते सांगा.''

नारायण म्हणाले, ''लक्ष्मी, अशा माणसांकरिता एक अगदी साधासोपा आणि सुलभ असा उपाय आहे, तो म्हणजे भगवंताचे सतत नामस्मरण करणे, कथाकीर्तन, पोथी यांचे श्रवण करणे. नामस्मरण हे पुण्यकृत्य सर्वश्रेष्ठ आहे.

भगवंताच्या सतत नामस्मरणामुळे नारदाला सर्व जगाचे ज्ञान झाले. वाल्या कोळ्याचा वाल्मीकी ऋषी झाला. शंकराचा दाह शांत झाला. ही झाली अखंड नामस्मरणाने पावन झाल्याची उदाहरणे; पण आयुष्यात फक्त एकदाच मरतेसमयी केलेल्या भगवंताच्या नामोच्चरामुळे अजामीळ या नावाच्या दुष्ट माणसाचाही उद्धार झाला.

म्हणून आजारी किंवा अगदीच अशक्त अशा लोकांची बसल्या जागेवर भगवान श्रीपुरुषोत्तमाचे राधाकृष्ण नामाचे सतत उच्चारण करीत जावे. या साध्या नामस्मरणाच्या व्रताला कसलाही त्रास किंवा खर्च नाही. समस्त लज्जा त्यजून भगवन्नामाचे चिंतन सातत्याने केले तर थोर पुण्य लाभते.

अधिकमासात स्नानदानादि व्रते-नियम या सर्वांपेक्षा भगवान पुरुषोत्तमाच्या राधाकृष्णाच्या– गोपाळाच्या– नामचिंतनाच्या महिमा फारच मोठा आहे. नामसंकीर्तनामुळे माणसाची सर्व पापे नाहीशी होतात. त्याचे कल्याण होते. यासंबंधीची एक कथाच मी तुला सांगतो. ती ऐक.''

नर्मदाकाठी भूसूर नावाच्या एका गावात सावित्री नावाची एक



स्त्री आपल्या पतीसह आनंदाने राहात होती. तिला हरिनामस्मरणाची आवड होती. येता-जाता, बसता-उठता, मुखी घास घेताना, घरीदारी, शय्येवरी सतत, समस्तांची लज्जा त्यजून ती भगवंताचे चिंतन करीत असे. कोठे, कधी काहीही झाले, घडले तरी म्हणायची, ''अहो! ही सारी भगवंताचीच लीला आहे!''

तिचा धनी मात्र आगळाच होता. त्याला देवापेक्षा पैसाच श्रेष्ठ वाटायचा. धन असले तरच मन प्रसन्न असते. श्रीमंत माणूस हाच देव ठरतो. त्याला समाजात मानसन्मान, संसारात सुख आणि सदैव धनलक्ष्मीचा सहवास घडतो म्हणून भगवंतापेक्षा लक्ष्मीची ध्यानाचीच तो सतत आराधना करी. धनप्राप्तीसाठी सारे कष्ट करी.

बरे मिळालेले किंवा मिळविलेले धन तो कधीही खर्च करीत नसे. त्याच्या चिकूपणाची अगदी कमालच होती. बायकोला वर्षातून फक्त दोन लुगडी, स्वतःला फक्त दोन पोषाख, रोजची मोजून एक भाकरी खायला आणि उपवास तर भरपूरच!

त्या धन्याने घरात सात धनाने भरून ठेवले, ते पाहून सावित्री म्हणाली, ''पोटी एकही संतान नाही. मग या धनाचा उपयोग काय!'' भगवंताच्या नामस्मरणाने काहीतरी पुण्य पदरी पडेल आणि तो आपली इच्छा पूर्ण करील. याच हेतूने ती सतत भगवंताचे नामस्मरण करायची! ''अशी या धनलोभी पतीशी आपली गाठ ही सुद्धा त्या भगवंताचीच लीला आहे झालं।'' असे ती म्हणायची!

घरात इतके धन साठविलेले असूनसुद्धा त्या चिकू, कंजूष माणसाने गावातील अगदी गरीब लोकांच्या यादीत आपले नाव ग्रामाधिकाऱ्याकडून नोंदवून घेतले होते.

राज्यातील अशा गरीब लोकांची नावे पुढे थेट राजापर्यंत जाऊन पोहोचली होती. राजाने मग अधिकमासात अशा गरीब लोकांना

भरपूर द्रव्य देण्याचे पुण्यकर्म आरंभिले. सावित्रीच्या पतीलाही मग त्या निमित्ताने आग्रहाचे निमंत्रण केले.

एके दिवशी भरदुपारी सावित्रीच्या घरी ग्रामाधिकारी आला. त्याने तिच्या पतीला राजाचे निमंत्रण दिले; पण त्या वेळी सावित्रीचा पती कुठेतरी धनप्राप्तीच्या कामासाठी परगावी जवळच गेलेला होता. ती त्या ग्रामाधिकाऱ्याला म्हणाली, "आता लवकरच माध्यान्ही ते परत घरी येतील!"

"मग आल्याबरोबर ताबडतोब त्यांना पाठवून द्या. कारण येथून सुमारे दोन कोसांवर मोठे सरकारी अधिकारी गोरगरिबांना राजाकडून आलेले भरपूर द्रव्य दान करणार आहेत. तेथे रामपूरच्या मठात रंगनाथस्वामींचा भेटा म्हणावे! हा निरोप सांगून तो सरकारी ग्रामाधिकारी निघून गेला.

थोड्याच वेळात सावित्रीचा पती परगावाहून घरी आला. येताना रस्त्यातून सरपणाचा भारा डोक्यावर घेऊन तो आला होता. घामाघूम झाला होता. भारा अंगणात टाकला. तेवढ्यात सावित्रीने ग्रामाधिकाऱ्याचा तो निरोप त्याला सांगितला.

"अरे वा! छान झालं!" पाहिलंस सावित्री, लक्ष्मीचा हा प्रताप आहे बरं! अगं पैशाकडेच पैसा ओढला जातो! मला गेलेच पाहिजे! हा पाहा निघालोच!" असे म्हणत आल्यापावली तो लगबगीने परत निघाला.

"अहो पण; पाणी तरी प्या की! थांबा थोडं! हा घाम..." सवित्री आग्रह करीत होती; पण लक्षात कोण घेतो? तो म्हणाला, "छे! छे! आता पाणी वगैरे काही नको. मी चाललो."

तरीही सावित्रीने दुधाने भरलेली झारी झटकन घरातून आणली आणि पटकन पतीच्या हातात बळेच दिली. "आता रस्त्यात तरी



हे प्या. तहान भागवा." असे ती म्हणाली. तो भराभर चालत गावापासून दूर गेला.

दोन कोस म्हणजे अर्धा योजन अंतर चालत जायचे. उन्हाळ्याचे दिवस. भरदुपारची वेळ. तहानेने त्याचा जीव कासावीस झाला. मग एका झाडाखाली तो थांबला. त्याने ती झारी तोंडाला लावली तो "अरेरे! हे पाणी नाही! हे तर दूध आहे. चांडाळणीने पाण्याऐवजी हे दूधच दिलेऽऽ!"

असे म्हणून त्याने रागाने तोंडातील दुधाची गुळणी फेकली. या दुधासाठी बायकोने उगाव जास्त खर्च केला, याचा त्याला राग आला होता. तो उठला. जवळच एक भले मोठे वारूळ होते. तो त्या वारुळाजवळ गेला आणि त्याच्या छिद्रात झारीतील सारे दूध त्याने ओतून दिले.

वारुळात दूध गेले तोच काय विलक्षण नवल घडले! फुत्कार टाकून एक भला मोठा भुजंग त्या वारुळातून फणा काढून बाहेर आला. मनुष्यवाणीने तो भुजंग म्हणाला, "शाबास! धन्य! धन्य! हे पुण्यवान पुरुषा! अशा ऐन उन्हाच्या वेळी तू मला दूध पाजलेस! मी तुझ्यावर प्रसन्न झालो आहे. इच्छा असेल तो वर माग!"

तो प्रकार पाहून सावित्रीचा पती दचकला. डोळे फाडून त्या भुजंगाकडे पाहू लागला. त्याचे ते शब्द ऐकून गोंधळून गेला. त....त प...प करीत तो म्हणाला, "शेषमहाराज, माझ्या बायकोने पाण्याऐवजी हे दूध मला दिले होते. तेच मी तुम्हांला नकळत दिले."

"हेच ते! तुझी बायको पुण्यशील आहे. ती सतत भगवंताचे नामस्मरण करते. माझ्या देवाचे चिंतन ती करते. यापुढे मी असा वर देतो, की तुझ्या पत्नीच्या हातून सहस्र भोजने घडतील. तू साठविलेले धन अन्नदानात खर्च करून टाक. ते संपल्यावर पुन:

मी तुम्हांला धन पुरवीन. कमी पडणार नाही. तसे जर न केलेस तर मात्र तुझ्या धनाच्या प्रत्येक रांजणात माझे दूत मोठमोठे काळे नाग येऊन बसतील. ते तुला दंश करतील आणि... पण नकोच ते! माझ्या भगवंताच्या भक्त स्त्रीला मी वैधव्याचा शाप देणार नाही! जा! आता येथून परत घरी जा! रामपूरला जाऊन राजाचे द्रव्यदान घेऊ नकोस. तू गरीब नाहीस! राजाला फसवू नकोस! जा!''

मग तो सावित्रीचा पती तसाच परत गेला आणि त्याने त्याच दिवशी शनिप्रदोष म्हणून गावातील सर्व लोकांना भोजन घातले. पुढेही तो अन्नदानात आपले धन खर्चू लागला.

विष्णूने म्हणाले, ''लक्ष्मी, असा आहे भगवंताच्या सतत नमास्मरणाचा महिमा. आता पुढे नवव्या अध्यायातील कथा ऐक!''

●●●

## अध्याय नववा : उपवासाचे महत्त्व

लक्ष्मी म्हणाली, ''जगन्नाथा, पूर्वाध्यायातील त्या सावित्रीचा पती आपला धनलोभ आणि कंजुषपणा सोडून पुढे सतत अन्नदानात आपले द्रव्य खर्च करू लागला. ती त्याची उपरती म्हणजे भगवंताच्या सतत नामस्मरणाचे त्याच्या बायकोच्या व्रताचे फळच म्हणायचे!

त्याने भुजंगाला नकळत दूध दिले आणि मग सहस्रभोजनांचे अन्नदान केले. त्या अन्नदानाची पुण्याई श्रेष्ठ तर खरीच; पण



अधिकमासात जर उपोषण केले तर त्याचीही पुण्याई थोरच असते, असे तुम्ही मला सांगितले होते.''

''तर अशा उपवासाच्या पुण्याईबद्दलची एखादी कथा मला सांगावी!'' लक्ष्मीच्या त्या इच्छेप्रमाणे मग नारायणांनी तिला पुढीलप्रमाणे एक कथा सांगितली—

नर्मदातीरी माहीष्मती नगरीत एक विधवा स्त्री राहात होती. तिचे नाव चंद्रिका असे होते. वैधव्यदशा प्राप्त झाल्यावर अधिकमासात ती स्नान-दान आणि व्रत-नियम यशाशक्ती करायची; पण एका अधिकमासात तिने महिनाभर संपूर्ण कडक उपवासाचे व्रतनियम पाळले.

आधीच नाजुक असलेल्या त्या चंद्रिकेच्या प्रकृतीवर त्या महिनाभराच्या उपवासामुळे, कडक नियमामुळे खूपच परिणाम झाला. ती इतकी कृश झाली, की तिला रस्त्याने नीट चालतासुद्धा येईना. बसली तरी उठताही येईना. तरीपण ती तशीच दररोजच्या नियमाप्रमाणे भल्या पहाटेच नर्मदेवर स्नानाला जायचीच!

अधिकमासातील कृष्णपक्षाचा शेवटचा दिवस. त्या दिवशी नित्यनियमाप्रमाणे भल्या पहाटेच नर्मदेवर चंद्रिका स्नानास गेली. स्नान कसे तरी झाले. परत घरी जाताना ती वाटेतच कोलमडून पडली. तिला उठताच येईना. ती ओरडू लागली.

तेवढ्यात जवळच्या झोपडीतून एक म्हातारी तिथे धावत आली. तिने चंद्रिकेला सावरून उठवून नीट बसविला आणि नीट न्याहाळून पाहिले तर काय नवल!

''अवो चंद्राबाई ऽऽ काय वो ही दशा करून घेतलीत? वळखूबी येईनात की! मला तरी वळखा! बघा की नीट! शांत व्हा.'' म्हातारीचे ते कळवळ्याचे बोलणे ऐकून क्षीण स्वरात चंद्रिका

म्हणाली, "कोण ग बाई तू? मी नाही ओळखलं!"

"अवो! तुमचे धनी व्हते तवा मी नवते का तुमच्या घरी कामाला! तुमची भांडीवाली मी तुरिजया नव्हं का!" म्हातारीने ती ओळख देताच चंद्रिकेचे डोळे उघडले. गहिवरून ती म्हातारीच्या गळ्यात हात घालून कण्हत कण्हत म्हणाली, "आता ओळखलं बरं! जया किती ग म्हातारी झालीस तू! आणि काय ही तुझी दशा! काय हा अवतार---"

"माझं मेलीचं राहू द्या! पण आधी तुमचं सांगा! हेऽऽ हे तुमाला अकाली आलेलं अवकळ म्हातारपण कशापायी बरं?" तुरिजयाच्या त्या प्रश्नावर चंद्रिका म्हणाली, "बाई गऽ ह्या अधिकमासात मी महिन्याभर कडक उपवासाचे व्रत केले आहे. पोटात अन्नाचा कणही नाही, त्यामुळे ही दशा झाली आहे गं ऽ"

"अवं मगं कशाला येवढं कडक वरत करायचं? जीव जाळून कुठं देव भेटतो व्हय? मरण येतं लवकरच! चला उठा बरं. माझ्या झोपडीत चला. जरासा भाकरतुकडा खा. पाणी प्या. उपास सोडा म्हंजी हुशारी येईल. ऐका माझं!"

जयाच्या त्या बोलण्यावर चंद्रिका उठून म्हणाली. "नाही. नाही. जयाबाई, मी व्रताचा भंग करणार नाही. काय वाटेल ते होऊ दे! मी काही खाल्लं तर माझे उपवासव्रताचे पुण्य लयाला जाईल!"

"तुमचं ते पुण्य लयाला जायच्याऐवजी मला– ह्या जयाला द्या! तेवढंच पुण्य माझ्या तरी पदरी पडलं म्हंत्ये. आम्हां गरिबाला कशाचं वरत आणि कशाचं पुण्य! सारी पंचाईतच चंद्राबाई. हे तुमचं उपासाचं थोडं तरी पुण्य मला आज द्याच! त्याच्यामुळं माझा पापिणीचा उद्धार होईल. आज ते मोठं पुण्य तुमाला लाभेल बघा!"



जयाची ती विनंती ऐकून चंद्रिका गोंधळली.

त्या वेळी घडलेला अनपेक्षित प्रकार, त्या पूर्वीच्या मोलकरीण बाईची ही आगळीच मागणी आणि हा अधिकमास, ही सर्व त्या भगवान पुरुषोत्तमाचीच इच्छा दिसते, त्याशिवाय ही अशी घटना घडलीच नसती! असा विचार चंद्रिकेच्या मनात आला. तिला त्या तुरिजयाची दयाही आली आणि मग तिने झटकन निर्णय घेतला.

भरून आणलेल्या झारीतील नर्मदेचे पवित्र पाणी हाती घेऊन ती जयाला म्हणाली, "तुरजाबाई, मी अधिकमासात जे कडक उपवासाचे व्रत केले त्यातील फक्त एक दिवसाच्या उपवासाचे पुण्य तुम्हांला दान देत आहे! घ्या हे पाणी हातात!"

तुरिजयाने ते दानाचे उदक आपल्या हातावर घेतले. तेवढ्यात काय आश्चर्य! तिचा देह दिव्य कांतिमान झाला आणि स्वर्गातून एक विमान तेथे आले. विमानातील देवदूतांनी तुरिजयाला सन्मानपूर्वक विमानात बसविले आणि चंद्रिकेला नमस्कार केला.

वरवर जाणाऱ्या विमानातून तुरिजयाने हात जोडून चंद्रिकेला नमस्कार केला आणि ती आनंदाने ओरडली, "वळख न्हाऊ द्याऽ चंद्राबाईऽऽ लई उपकार झालेऽऽ येते मीऽऽ!"

तो अघटित चमत्कार पाहून चंद्रिका आश्चर्याने थक्क झाली. अधिमासातील एका दिवसाच्या उपवासाची एवढी पुण्याईऽऽ तर मग संपूर्ण महिनाभर कडक उपवासाचे केव्हढे फळ! देवदूतांनी मला का बरं त्या विमानात घेतलं नसेल?" असा विचार करीत करीत ती कशीबशी घरी गेली.

चंद्रिकेच्या मनात सारखा तोच विचार यायचा; पण उत्तर सापडत नसे. त्यानंतर पाच अधिक महिने निघून गेले, चंद्रिकेचे व्रत चालूच राहिले. पुढे ती खरोखरच म्हातारी बनली.

चंद्रिका एकदा तीर्थयात्रेला – काशी-वाराणशी क्षेत्रात गेली. तिने गंगास्नान केले. काशीविश्वनाथाचे दर्शन घेतले. क्षेत्र प्रदक्षिणा केली. त्यावेळी आणखी एक चमत्कार झाला. काशिनाथ नावाचा एक तरुण चंद्रिकेपुढे आला. त्याने चंद्रिकेला वाकून नमस्कार केला आणि तो म्हणाला, " मला ओळखलं का बाईऽऽ "

चंद्रिका भांबावली. म्हणाली, " नाही बाळ ! कोण तू ? " मग तो काशिनाथ म्हणाला, 'चंद्राबाई मी आज जरी हा असा पुरुष दिसतो आहे तरी माझा हा दुसरा जन्म आहे बरं का ! पूर्वजन्मी मी तुमची भांडेवाली मोलकरीण तुरिजया होते. त्या अधिकमासात तुम्ही नदीवरून आंघोळ करून आला होता. वाटेत कोलमडून पडला होता. मी तुम्हांला उठवलं. मग तुम्ही मला तुमच्या उपवासांचे एक दिवसांचे पुण्य दान दिले होते. त्या पुण्याईमुळे मला विमान आलं मी स्वर्गास गेले होते !

नंतर काही दिवस मी स्वर्गसुख भोगलं ! लगेच देवाने मला .हा दुसरा जन्म दिला. या काशीक्षेत्रात आता मी काशिनाथ झालो. यात्रेकरूंना रस्ता दाखवण्याचे काम मी करीत असतो. तुमचे उपकार म्हणून हा जन्म मला मिळाला. आज तुमचे तापसीचे थोर दर्शन घडले आणि तुम्हांला इथे पाहताच मला माझ्या पूर्वजन्माचे सरळं ज्ञान आले !

त्या काशिनाथाने तो सारा वृत्तांत सांगताच आणि त्याने चंद्रिकेला थोर तापसी पुण्यवती म्हणताच तिला एकदम गहिवरून आले. तिने काशिनाथाच्या गळ्यात गळा घालून मोठ्याने हंबरडा फोडला – " अग जया ऽऽ मी अधिकमासातील फक्त एक दिवसाचे पुण्य तुला दान दिले अन् त्या तेवढ्या पुण्याईने हा तुझा असा उद्धार झाला ऽ पण माझं काय गं ऽऽ तो देव मला अजून कसा पाहात नाही ? ऽ अरे काशिनाथा ऽऽ "



मग तेथेच काशिनाथाने महादेवाच्या पिंडीची मोठ्या थाटाने स्थापना केली. मंदिर बांधले. मरेपर्यंत तो त्या चंद्रेश्वराचे दर्शन दररोज नित्यनेमाने घेत राहिल्या.

विष्णू म्हणाले, "लक्ष्मी, अजूनही काशीक्षेत्रात त्या थोर तापसीच्या स्मरणार्थ असलेल्या चंद्रेश्वर लिंगाचे दर्शन हजारो लोक घेत असतात. आता पुढे दहाव्या अध्यायात मौनभोजनाचे महत्त्व आणि आणखी एक कथा सांगणार आहे. ती तू चित्त देऊन ऐक. "

●●●

## अध्याय दहावा : मौनभोजनाचे महत्त्व

विष्णू म्हणाले, " लक्ष्मी, मागील अध्यायात सांगितले, मी की त्या चंद्रिका तापसीने अधिक महिन्यात कडक उपवासाचे व्रत केले त्यामुळे तिचे खूप हाल झाले; पण शेवटी तिच्या जन्माचे सार्थकच झाले. त्या चंद्रिकेच्या स्मरणार्थ काशीक्षेत्रात चंद्रेश्वर झाला; पण असे उपवासाचे व्रत ज्यांना करणे शक्यच नाही त्यांनी अधिकमासात फक्त एकवेळ भोजनाचे म्हणजे नक्त व्रत करावे आणि तेही अगदी मौनव्रत सांभाळून भोजन करावे. त्यायोगेही पुण्य मिळते.

मौनाचे महत्त्व अगदी विशेष पुण्यप्रद असते. स्नान, होम आणि भोजन करताना प्रत्येकाने मौन पाळावे. तथापि, हरिनाम घेण्याला हरकत नाही. उदरभरण हाही एक यज्ञच आहे ! मौन पाळण्यामुळे पापे दूर होतात. सौभाग्यवृद्धी होते. आयुष्य वाढते. भांडणे मिटतात. सुखशांती आणि आगळीच कांती मिळते. मौन पाळणे म्हणजे

एकप्रकारचे व्रतच असते.

दशमी, द्वादशी पौर्णिमा, अमावास्या, व्यतिपात, वैधृती वगैरे अधिकमासातील पुण्यकाळात तर आवर्जून मौन पाळले जावे. इतर काही स्नान-दान किंवा व्रत-नियम होत नसतील तर निदान हे मौनाचे व्रत जरी पाळले तरी ते श्रेष्ठ पुण्यकारक ठरते!

महिनाभर केलेल्या कडक उपवासाचे पुण्य- फक्त एक वेळ– निदान पर्वकाळात तरी एक वेळा केलेल्या मौन भोजनाच्या पुण्याबरोबर असते. आणि म्हणूनच पूर्वीच्या काळी नारद, विश्वमित्र वगैरे ऋषिमुनी आणि संत, सज्जन, निष्ठावान लोक सतत मौनव्रत पाळीत असत. मौनाचे वेळी भगवंताच्या नामोच्चाराला मात्र मुळीच हरकत नाही.

अवंती नगरातील वेदशर्मा नावाचा एक साधा गृहस्थ केवळ या मौनभोजनाच्या व्रतपुण्याईने उद्धरून गेला. त्याला स्वर्गात मानाचे स्थान मिळाले. ती कथा अजूनही सारे लोक मानतात! मौनभोजन व्रताच्या उद्यापनाचे दिवशी देवळात घंटा बांधून दान द्यावी.

अशा प्रकारे, लक्ष्मी, या अधिकमासात श्रीपुरुषोत्तमाच्या प्रीत्यर्थ करावयाच्या आणखी व्रताची माहिती मी तुला पुढील अकराव्या अध्यायात सांगतो. ती तू मन लावून ऐक.

●●●

## अध्याय अकरावा : वैधृती आणि व्यतिपात

लक्ष्मी म्हणाली, "जगन्नायका, या अधिकमासात पाच पर्वे फारच पुण्यकारक आहेत असे म्हणतात तर ती कोणती? त्यांचे महत्त्व काय आणि त्या पर्वकाळात कोणकोणती पुण्यकर्मे करावीत ते मला सांगा."



भगवान विष्णू म्हणाले, "ठीक आहे. थोडक्यात सांगतो. ही पाच पर्वे म्हणजे वैधृती, व्यतिपात, पौर्णिमा, अमावास्या आणि द्वादशी या पाच पर्वांची अनुक्रमाने माहिती देतो."

प्रथम-वैधृती हा पर्वकाळ फारच पुण्यकारक असतो. तसे पाहिले तर प्रत्येक महिन्यात वैधृतीचा योग असतोच; पण अधिकमासातील वैधृती योग साधून जर त्या पर्वकाळात स्नानदानादी पुण्यकर्मे केली तर ती विशेष फलदायी होतात.

पूर्वी सूर्यवंशातील मांधाता नावाच्या राजाने खूप यज्ञयाग केले. त्या पुण्याईमुळे इंद्राचे इंद्रपद जाऊन त्या राजाला इंद्रपद मिळाले. मग देवेंद्र असाच भटकत असता नारदमुनींनी इंद्राला वैधृतीपर्वात अधिकमासात स्नान-दानाही पुण्यकर्मे करण्यास सांगितली. त्याप्रमाणे इंद्राने वैधृती पर्व साधून व्रते केली. त्या पुण्याईमुळे पुन: इंद्राला त्याचे इंद्रपद मिळाले.

लक्ष्मी, माझा थोर भक्त-प्रल्हाद हा दैत्यकुळात जन्मला; पण त्याने माझी नामस्मरण-भक्ती केली. त्यातही अधिकमासातील वैधृती पर्वकाळात सतत नामस्मरण केले; त्यामुळे त्याला राजपद मिळाले.

या वैधृतीपर्वात तिळाचे सोळा लाडू, केळी, फळे, खारका सुपाऱ्या सोळा संख्येत यथाशक्ती ब्राह्मणाला दान द्याव्या. दुधाची खीर, तुपाचा दिवा आणि एखादे वस्त्र, पात्रही द्यावे. या दानामुळे देव आणि पितर संतुष्ट होतात.

पंचपर्वात वैधृतीला पहिला मान दिलेला आहे. स्वत: महादेव, ब्रह्मदेव यांनीही या पर्वात पुण्यकर्मे केली. जाणते लोक पंचांगात

पाहून वैधृतीवा काळ बरोबर साधतात.

आता दुसरे पर्व व्यतिपात याची माहिती सांगतो. वैधृतीप्रमाणेच व्यतिपात हा योगसुद्धा प्रत्येक महिन्यात असतोच. ज्या वेळी चंद्रसूर्याचा समान योग प्राप्त होतो त्या वेळी व्यतिपाताचा पर्वकाळ असतो. प्रत्येक महिन्यातील व्यतिपात योगात स्नान-दानादी पुण्यकर्मे लोक करतातच; परंतु अधिकमासातील व्यतिपात पर्व साधून जर ती पुण्यकर्मे केली तर त्यांचे विशेष महत्त्व आहे.

व्यातिपात पर्वकाळात घरी जरी स्नान केले तरी ते तीर्थस्नानापेक्षाही जास्त पुण्यप्रद असते. स्नान चुकवू नये. प्रात:काळी लवकर उठून स्नान करावे. देवपूजा नित्यनेमाने करावी. या पर्वकाळात स्त्री-पुरुषांनी ब्राह्मणाला शक्य ते धान्य दान द्यावे. ते दान विशेष पुण्यकारक आणि श्रेष्ठ ठरते. दान करण्यात निष्ठा किंवा श्रद्धा असावी लागते. गर्व किंवा अहंकाराने केलेले दान निष्फळ ठरते. लक्ष्मी, अधिकमासात पंचपर्वांपैकी ' वैधृती ' व ' व्यतिपात ' ही दोन पर्वे योगाची आहेत. कालगणनेच्या पंचांगात तिथी, वार, नक्षत्र, योग आणि करण ही पाच अंगे महत्त्वाची असतात. आता पंचपर्वांपैकी दोन पर्वांची थोडी माहिती तुला दिली. पुढे बाराव्या अध्यायात मी पौर्णिमा आणि अमावास्या या दोन तिथीपर्वांची माहिती देणार आहे. तर तू शांत चित्ताने ऐक.

●●●

## अध्याय बारावा : पौर्णिमा आणि अमावास्या

भगवान विष्णू म्हणाले, ''लक्ष्मी, अधिकमासातील पंचपर्वांपैकी पौर्णिमा या तिथीपर्वाची माहिती सांगतो. पौर्णिमेचे



पर्व साधून जे लोक स्नानदानादी पुण्यकर्मे करतात त्यांना शंभरपट पुण्याचा लाभ होतो.

पौर्णिमेच्या दिवशी प्रात:स्नान यथाविधी करावे. नंतर दुपारी ब्राह्मणाला यथाशक्ती अन्न, वस्त्र, पात्र यांचे दान द्यावे. प्रत्येक महिन्यात पौर्णिमेच्या या व्रताला महत्त्व आहेच.

ज्येष्ठीपौर्णिमा – वटसावित्री पूजन-ब्रह्मदेव प्रसन्न !

आषाढीपौर्णिमा – गुरुपौर्णिमा-व्यासपूजन-नारायण प्रसन्न !

माघीपौर्णिमा – मोहिनीराज पूजन-रुद्रदेवता प्रसन्न !

चैत्री – अनंत, वैशाखी – पितृदेवता, मार्गशीर्षी – यक्षकिन्नर, पौषीपौर्णिमा – भवानी देवता, श्रावणी नारळी पौर्णिमा – रक्षाबंधन, असे प्रत्येक महिन्यातील पौर्णिमेला महत्त्व आहे; परंतु अधिकमासातील पौर्णिमेचा पर्वकाळ हा विशेष पुण्यप्रद असतो. या पर्वकाळातील स्नानदानाच्या व्रतामुळे भगवान पुरुषोत्तम प्रसन्न होऊन इच्छित मनोरथ पूर्ण करतात, मोक्षप्राप्ती होते.

आता अमावास्या या पर्वकाळात विशेष महत्त्व आहे ते पितरांना पिंडदान करण्याचे. पुत्रांनी आपल्या स्वर्गीय पितरांना श्राद्ध करून पिंडदान द्यावे. ब्राह्मण-भोजन घालावे. तीळतर्पण आणि पिंडदानामुळे स्वर्गीय पितर संतुष्ट होतात. ते आपल्या वंशजांना शांती, सुख, वैभव आणि प्रगती यांचा आशीर्वाद देतात.

अधिकमासाच्या अमावास्या पर्वकाळात जर हे व्रत साधले तर पितरांचा उद्धार होऊन त्यांना मोक्षप्राप्ती होते. आणि म्हणूनच या पर्वाचे महत्त्व विशेष पुण्यकारक आहे.

लक्ष्मी, आता पुढे तेराव्या अध्यायात द्वादशीपर्वाचे महत्त्व विस्तारपूर्वक सांगतो. ते तू मन:पूर्वक ऐक !

●●●

## अध्याय तेरावा : द्वादशीचा महिमा

भगवान विष्णू म्हणाले, "लक्ष्मी, आता पंचपर्वांमधील द्वादशी तिथीचा महिमा तुला सांगतो. द्वादशीचे हे पुण्यव्रत तीन दिवस पाळावे लागते. दशमी तिथीला फक्त एकच वेळ भोजन घ्यायचे म्हणजे अर्धा उपवास करायचा. मग दुसरे दिवशी एकादशी संपूर्ण एक दिवस उपवास करायचा आणि तिसऱ्या दिवशी द्वादशीला शक्य तितक्या लवकर त्या एकादशीचे पारणे करायचे. म्हणजे ब्राह्मणासह यजमानाने मिष्टान्नभोजन करायचे! द्वादशीला दिवसा झोपू नये!

वर्षातील प्रत्येक महिन्यात दोन द्वादशी तिथी असतात. त्याही वरीलप्रमाणे तीन दिवस व्रत पाळूनच कराव्यात; परंतु अधिकमासातील एक जरी द्वादशी तीन दिवस व्रत पाळून केली तरी त्या बाकीच्या सर्व द्वादशीचे पुण्य पदरी पडते.

द्वादशीपर्वाच्या व्रतात साधनद्वादशी हा एक विशेष पुण्यकारक योग असतो. साधनद्वादशी म्हणजे सूर्योदयापूर्वीच एकादशीचे पारणे करणे. द्वादशीला सूर्योदयापूर्वीच ब्राह्मणासह यजमानाने भोजन घेणे; पण हा पर्वकाळ वेळेतच साधला पाहिजे.

ती वेळ जर चुकली तर राजा अंबरीषाप्रमाणे यजमानाची फजिती होते. ती अंबरीष राजाची कथा मी तुला अगदी सविस्तर सांगतोच.

पण अधिकमासातील एका द्वादशीला तरी मुख्य म्हणजे अन्नदान करणे हेच फारच मोठे पुण्यकर्म आहे. त्या पर्वकाळात ब्राह्मणाला भोजन, वस्त्र, पात्र, फळे, तांबूल आणि तुपात तळलेले तीस तीन अनारसे, धोंडे (मोदक) किंवा बत्तासे, खारका, सुपाऱ्या इ. दान



दिले पाहिजे. आप्तेष्टांसह पुरणाच्या धोंड्याचे भोजन केले पाहिजे.

आता साधनद्वादशीचे कडक व्रत करणाऱ्या अंबरीष राजाची कथा सांगतो. ती मन लावून ऐकावीस. त्या कथेमुळे तुला द्वादशीचा विशेष महिमा कळेल.

पूर्वी सूर्यवंशात अंबरीष नावाचा एक सार्वभौम राजा होता. तो मोठा धर्मनिष्ठ, सदाचारी आणि पुण्यवान होता. दर महिन्याला साधनद्वादशीचे व्रत तो नेमनिष्ठेने करायचा. भल्या पहाटेच सूर्योदयापूर्वी येतील तितक्या ब्राह्मणांना तो यथेच्छ भोजन घालायचा.

अंबरीष राजाने अशी कितीतरी सहस्रभोजने घातली. त्याच्या त्या साधनद्वादशीच्या पुण्याईमुळे तो इंद्रपदाला योग्य असा ठरला. आपले पद तो राजा घेईल, की काय याची देवेंद्राला भीती वाटू लागली. आणि म्हणूनच देवेंद्र अगदी अस्वस्थ झाला.

एके दिवशी दुर्वास ऋषी देवेंद्राकडे आले होते. आगतस्वागत झाल्यावर दुर्वास ऋषी म्हणाले, "देवेंद्रा, अलीकडे तुझे शरीर अगदीच कृश होत चालले आहे!"

"काय करणार मुनिवर्य! मी चिंतेने जळत चाललो आहे. पृथ्वीवरील तो अंबरीष राजा अधिकमासातील साधनद्वादशीचा नियम अखंडपणे चालू ठेवीत आहे. त्याची ती थोर पुण्याई म्हणजे मला विघ्नच आहे."

देवेंद्राने हे सांगितल्यावर दुर्वास ऋषी म्हणाले, "मग काय बिघडले? द्वादशीचे हे व्रत प्रत्यक्ष ब्रह्मदेवानं केले होते. महादेवाने केले होते. तूसुद्धा केले होतेस ना!"

"ते खरे; पण मुनिवर्य, तो अंबरीष राजा आता माझे, हे इंद्रपद घेईल. मग मी काय करू? मुनिवर्य, आपण त्या अंबरीषाच्या

द्वादशीव्रताचा जर भंग केला... तर..."

देवेंद्राची ती दुर्बुद्धी ऐकून दुर्वास ऋषी म्हणाले, "छे! छे! ते शक्य नाही! अरे त्या अंबरीषाला प्रत्यक्ष विष्णूचे साहाय्य आहे! त्याच्या त्या व्रताचा भंग करणे म्हणजे माझ्यावर आपत्तीच की!"

"ते काही नाही! गुरुवर्य, आपण माझ्यासाठी तरी एकदा समक्ष अंबरीषाकडे जावे आणि पाहावे तरी काय काय होईल ते!" देवेंद्राने विनंती केली.

विष्णू म्हणाले, "लक्ष्मी, पुढील हकीकत पुढे चौदाव्या अध्यायात मी तुला सांगतो ती ऐकू!"

●●●

## अध्याय चौदावा : अंबरीष राजाची कथा

भगवान म्हणाले, "लक्ष्मी, दुर्वास ऋषींनी देवेंद्राची खूप समजूत घातली; पण तो पुनःपुन्हा विनवणी करू लागला, की "मुनिवर्य तुम्ही त्या अंबरीष राजाकडे एकदा जावे आणि पहावे तरी काय काय होईल ते!"

मग दुर्वास ऋषींना नाही म्हणवेना. त्यांनी मनात विचार केला, की काही हरकत नाही. या निमित्ताने तरी देवेंद्राच्या आग्रहामुळे आपण अंबरीषराजाकडे जावे आणि त्या पुण्यवंताचे दर्शन तरी घ्यावे; पण त्याच्या त्या पुण्याईच्या सत्त्वहरणाचे काय---? आणि देवेंद्राचा तर त्याच गोष्टीबद्दल आग्रह आहे. असो. पाहू या तरी पुढे काय होते ते!"

तो अधिकमास चालू होता. अंबरीष राजाने नेहमीप्रमाणे द्वादशीचे व्रत केले होते; पण दशमीला फक्त एकवेळ भोजन, एकादशीला संपूर्ण कडक उपवास आणि द्वादशीला सूर्योदयापूर्वी पारणे म्हणजे त्या साधनद्वादशीला ब्राह्मणांची सहस्रभोजने!



मग दुर्वास ऋषींनी ती संधी साधून एकादशीच्या रात्रीच आपल्या साठ सहस्र शिष्यांसह अंबरीष राजाच्या राजवाड्यात प्रवेश केला. तो एवढ्या संख्येचा शिष्य समुदाय आणि स्वतः दुर्वास ऋषी आलेले पाहताच अंबरीष राजा आनंदाने म्हणाला, "वाहवा! आज माझा भाग्योदयच झाला. इतकी सहस्रभोजने मला साधनद्वादशीच्या पारण्याला घडणार! ऋषिवर्य आपले थोर उपकार आहेत!"

झाले! आगतस्वागत आटोपले. विश्रांतीची व्यवस्था झाली. पंचपंच उषःकाल झाल्यावर दुर्वास ऋषी म्हणाले, "राजा, आम्ही सर्वजण भुकेलेलो आहोत. नदीवर जाऊन स्नानादी प्रातःकर्मे आटोपून येतो, तोवर आमच्या भोजनाची उत्तम व्यवस्था करून ठेव!"

त्यावर अंबरीष राजा म्हणाला, "मुनिवर्य, आपण काळजी करू नये. आपणा सर्वांची भोजनाची उत्तम व्यवस्था होईलच; पण आज साधनद्वादशी आहे हे लक्षात असू द्या. अगदी पहाटेच आपण नदीवरून लवकर परत यावे. कारण सूर्योदयापूर्वी पारणे पार पडले पाहिजे! नेम चुकता कामा नये!"

"ठीक आहे!" असे म्हणून दुर्वास ऋषी आणि त्यांचे ते साठ सहस्र शिष्यगण नदीवर स्नानासाठी निघून गेले. अंबरीष राजाने त्या सर्वांच्या यथेच्छ भोजनासाठी षड्रस पाकसिद्धता करून ठेवली.

मग राजाने आपला नित्यनेम स्नान, देवपूजा वगैरे आटोपून नैवेद्य, वैश्वदेव करून काकबळी बाहेर टाकला आणि तो त्या अतिथींची मार्गप्रतीक्षा करू लागला.

सूर्योदयाची वेळ होत चालली. अरुणोदय झाला तरीही तो

ऋषींचा मेळा नदीवरून राजवाड्याकडे आला नाही म्हणून राजाने काही दूत नदीवर पाठविले. त्यांना लवकर येण्यासाठी निरोप दिला; परंतु दुर्वास ऋषी आणि शिष्यगण स्नान करून संध्या, जप, तर्पण करण्यात गुंग झाले होते. काहीजण म्हणाले, "सूर्य उगवल्याशिवाय सूर्याला अर्घ्य तरी कसे देणार? सूर्योदय होईपर्यंत नदीवरच थांबले पाहिजे!"

"सूर्योदय झाल्याशिवाय ऋषिगण भोजनासाठी येत नाहीत." हा निरोप राजाला कळला तेव्हा राजा तर पार घाबरून गेला. सूर्योदयापूर्वी भोजने झालीच पाहिजेत. हा तर साधन द्वादशीव्रताचा नियम आहे! आणि... तो नियम आज पाळला जाणार नाही असे दिसते. आता काय करावे? राजाला मोठी काळजी लागली.

बरे! आपण भोजन अगोदर घेऊन द्वादशी साधावी तर ते दुर्वास ऋषी भलतेच रागीट आहेत. ते शाप देतीलच! व्रताचा भंग होऊ नये म्हणून आता काय करावे? असा विचार करता करता राजाला एक उपाय सापडला.

मग अंबरीष राजाने विष्णूला तुळशीपत्र वाहून तीर्थ घेतले आणि सूर्योदयापूर्वी साधनद्वादशी व्रताची सांगता केली. आता राहिले ते फक्त भोजनच!

थोड्या वेळात दुर्वास ऋषी आणि शिष्यगण सर्वजण नदीवरून सूर्याला अर्घ्य देऊन राजवाड्यात आले, तेव्हा दुर्वास ऋषी म्हणाले, "राजा, थोडा उशीर झाला; पण द्वादशीव्रताचा भंग झाला, असे मानू नकोस. चला आता भोजनाची सिद्धता करा. पाने वाढा!"

राजा म्हणाला, "मुनिवर्य, माझ्या व्रताचा भंग झाला नाही. सूर्योदयापूर्वी मी महाविष्णूचे तीर्थ घेतले आणि वेळ साधली. आता चला आपण सर्वजण भोजन करा!"



"काय? तू तीर्थ घेऊन द्वादशीव्रत पूर्ण केलेस?... अरे चांडाळा, तीर्थ घेतलेस ते भोजनाच्या जागी ना? मग ते तू भोजनच केलेस की! आणि आता आम्ही काय त्या उष्ट्या अन्नाचे भोजन करावे? छे! छे! आता आम्हांला ते भोजन नको! चला रे शिष्यांनो, परत चला. निघा येथून!" असे म्हणत दुर्वास ऋषी रागारागाने तणतणत निघाले.

राजा अंबरीष हात जोडून नम्रपणाने म्हणाला, "मुनिवर्य, असा राग करू नका. अन्नाला डावलून जाऊ नका." त्यावर दुर्वास ऋषी संतापून म्हणाले, "राजा, तुला मोठा गर्व झाला आहे! तुला वाटले मीच साधनद्वादशीचे हे व्रत नेमनिष्ठेने पाळले; पण आम्हांला भोजनाचे निमंत्रण देऊन आम्ही येण्यापूर्वीच तू तीर्थप्राशन करून का होईना आधी द्वादशी सोडलीस! हे महापाप केले आहेस!

"या पापाचे फळ म्हणून मी तुला शाप देतो" की तुला मुक्ती मिळणार नाही! शंभर वेळा गर्भवास पत्करून शतजन्म दुःखे भोगावी लागतील! जा! आम्ही आता येथून उपाशी पोटीच जाणार! आम्हांला नको ते तुझे उष्टे अन्न! तीर्थ घेऊन सोडली द्वादशी आणि आमंत्रित ठेवले उपाशी! वाहवा रे राजा अंबरीष!"

अंबरीष राजा पुन:पुन्हा विनवीत होता तरीही तो कोपिष्ट दुर्वास ऋषी शांत होईना. तो म्हणतच राहिला, "राजा, तू हे महापाप केले आहेस. मी तुला शाप दिला आहे! शतजन्म तुला गर्भवासाची दुःखे भोगावीच लागतील"

मग अंबरीष राजाने प्रभू विष्णूचा धावा केला. त्याने प्रार्थना केली, "भगवंता, मी हे तुझे साधनद्वादशीचे व्रत नेमनिष्ठेने केले; पण त्या व्रताचा भंग होऊ नये म्हणून तुझे तीर्थ घेतले तर हे काय माझ्यावर या शापाचे अरिष्ट कोसळले! देवा, आज माझी लाज

राखली पाहिजेस! या ऋषीने माझे आज जणू सत्त्वहरणच केले आहे!''

तेवढ्यात चमत्कार झाला. भगवान विष्णू स्वतः गरुडावर आरूढ होऊन आले आणि राजा अंबरीषापुढे येऊन दुर्वास ऋषींना म्हणाले, ''हे मुनिश्रेष्ठा, अबंरीष राजा हा माझा परमश्रेष्ठ भक्त आहे! त्याला दिलेला हा शाप आता मलाच भोगावा लागणार आहे!''

तरीही दुर्वास ऋषींना संताप आवरेना. त्यांनी आपली एक जटा उपटून जमिनीवर आपटली. त्या जटेतून एक भयंकर कृत्या राक्षसी उत्पन्न झाली. ती अंबरीषावर धावून गेली. ती अंबरीषाला खाऊन टाकणार तोच...

भगवान विष्णूंनी आपले सुदर्शनचक्र तिच्यावर सोडले. त्या चक्राने कृत्येला ठार केले आणि मग ते सुदर्शनचक्र दुर्वास ऋषींच्या भोवती गरगर फिरू लागले! ''हे चक्र आपणाला आता ठार मारणार या भीतीने दुर्वास ऋषी पळत सुटले. चक्राने त्यांचा पिच्छा सोडला नाही. शेवटी दुर्वास ऋषी विष्णूला शरण गेले. चक्र आवरण्यास त्यांनी विनंती केली. विष्णू म्हणाले, 'माझा परमभक्त हा अंबरीषच त्याला आवरील!'' मग अंबरीषाने त्या चक्राला शांत केले. दुर्वासाचे संकट टळले. त्यांनी क्षमा मागून मग द्वादशीचे ते भोजन करून आपला शाप मागे घेतला. विष्णू म्हणाले, 'लक्ष्मी, अशी आहे अंबरीष राजाच्या भक्तिसामर्थ्याची कथा. आता पुढे पंधराव्या अध्यायात एक आगळीच कथा मी तुला सांगणार आहे. ती तू शांतपणे ऐक!

●●●



## अध्याय पंधरावा : भक्तीची शक्ती

भगवान विष्णू म्हणाले, ''लक्ष्मी, आता तुला द्वादशीपर्वाची एक विशेष कथा सांगतो ऐक! रामाने रावणाला मारले. बिभीषणाला लंकेचे राज्य दिले. राम सीतेसह अयोध्येला गेले. सारे स्थिरस्थावर झाले. अयोध्येत रामराज्य सुरू झाले. येथपर्यंतचे रामायण सर्व प्रसिद्ध आहे; पण तिकडे लंकेत मात्र बिभीषणाला चैनच पडेना. कारण त्याच्या विरोधात काही राक्षसवीर शिल्लक राहिले होते. त्यांच्या अंतस्थ कारवाया सुरू झाल्या. रावण आणि त्याचा पुत्र इंद्रजीत, कुंभकर्ण आणि त्याचे पुत्र कुंभ, निकुंभ असे घरातील वीर पुरुष ठार केले होते तरी कुंभकर्णाची सून म्हणजे निकुंभाची पत्नी ही फार महत्त्वाकांक्षी स्त्री होती. तिने बिभीषणाविषयी अंतःकलह सुरु केला.

''लंकेच्या राजपदावर बिभीषणाऐवजी आपला पुत्र– कुंभकर्णाचा नातू- म्हणजे निकुंभाचा पुत्र– पुंडरिक यालाच बसवायला पाहिजे'' असा त्या महत्त्वाकांक्षी सुनेचा दावा होता. आणि म्हणूनच ती बिभीषणाला सतत विरोध करू लागली.

एके दिवशी ती आपला पिता– शतमुखी रावण– याच्याकडे गेली. तिने आपला हट्ट आणि आपल्या पुत्राचा– पुंडरिकाचा राज गादीवरील हक्क पित्याला सांगितला. तेव्हा तिचा पिता शतमुखी रावण म्हणाला, ''तो लंकापती दशमुख रावण अगदी मूर्ख होता. त्याने आपल्या कुळाचा घात केला. युद्धाच्या वेळी मला बोलावले असते तर मी त्या रामाचा आणि त्याच्या त्या वानरसेनेचा एकच घास केला असता; पण असो. आता काय! झाले ते गेले!

आता मी लंकेवर स्वारी करतो. बिभीषणाला राजगादीवरून काढतो. माझा नातू पुंडरीक यालाच लंकेचा राजा करतो. तू आपल्या पुत्राचे सुख आनंदाने पाहा!'' इतके सांगून तो शतमुखी रावण आपल्या सेनेसह लगेच चाल करून गेला. त्याने लंकेला वेढा दिला. घनघोर युद्ध झाले.

शतमुखी रावणाने लंकेवर केलेल्या अकस्मात आणि जबरदस्त हल्ल्यामुळे बिभीषणाचा आणि त्याच्या सैन्याचा निभाव लागेना. त्या युद्धात बिभीषणाचा पराभव झाला. तो आकाशमार्गे पळून गेला.

शतमुखी रावणाने मग पुंडरिकाला लंकेच्या गादीवर बसविले तेव्हा त्या पुंडरिकाच्या मातेला आनंद झाला. तिने आपल्या पित्याचा सन्मान करून त्याला निरोप दिला.

पराभूत झालेला बिभीषण थेट अयोध्येला गेला आणि त्याने प्रभू रामचंद्राला आपल्या अपमानाची कहाणी सांगितली. रामाला त्या शतमुखी रावणाचा खूपच राग आला. रामप्रभू म्हणाले, ''माझा परमभक्त बिभीषण त्याला त्रास देणाऱ्यांना मी शिक्षाच करीन! बिभीषणा, आज अधिकमासातील एकादशी आहे. माझे साधनद्वादशीचे व्रत असते. मी आताचे आता निघून त्या शतमुखी रावणाला ठार करतो आणि तुला पुन: तुझ्या लंकेच्या गादीवर बसवून उद्या सूर्योदयाच्या आत परत येऊन माझ्या साधनद्वादशी व्रताची सांगता करतो!''

श्रीरामाचे ते प्रतिज्ञा-वचन ऐकून बिभीषण म्हणाला, ''राजाधिराज, प्रभू ही प्रतिज्ञा कशी शक्य आहे? कारण तो शतमुखी रावण अती प्रबळ आहे. तो आता लंकेत नाही. येथून पाच कोटी योजने दूर दधिसमुद्र आहे, त्या समुद्राच्या मध्यभागी



लक्षयोजने लांबीरुंदीच्या विशाल बेटावर त्या शतमुखी रावणाचे वास्तव्य आहे. तेथे जाऊन त्याचा नि:पात करणे आणि नंतर लंकेत जाऊन मला राजपद देऊन उद्या परत अयोध्येला सूर्योदयापूर्वी येऊन तुमच्या त्या साधनद्वादशीचे पारणे करणे हे सर्व अशक्य वाटते!''

''ते काही नाही! मी एकवचनी आहे! माझी प्रतिज्ञा आणि माझे द्वादशीचे व्रत यांचा मी भंग होऊ देणार नाही. माझ्या भक्तासाठी मी वाटेल ते दिव्य करीन, शिवाय भक्तीची शक्ती सर्वश्रेष्ठ असते. बिभीषणा तू काळजी करू नकोस.'' प्रभू रामचंद्राने हे सर्व सांगितले आणि लगेच ते कार्य सुरु केले.

रामाने वायुपुत्र हनुमानाचे स्मरण करताच तो ताबडतोब येऊन हात जोडून रामापुढे उभा राहिला आणि म्हणाला, ''प्रभू आज्ञा व्हावी!''

राम, हनुमान आणि बिभीषण यांचे बोलणे चालू होते तेवढ्यात नारदमुनीही तेथे आले. त्यांनी शतमुखी रावणाचा तो सारा प्रताप ऐकला. रामाची प्रतिज्ञाही ऐकली आणि मग ते हसत म्हणाले, ''रामा, तुझी हे प्रतिज्ञा अचाट आहे. तो शतमुखी रावण अती प्रबळ आहे. त्याचे सैन्य अफाट आहे; परंतु मारूतीसारखा वीर असल्यावर हे सारे संकट दूर करणारच. कारण भक्तीची शक्ती सर्वश्रेष्ठ आहे. चला वेळ थोडा आहे! कामाला लागा! पाहू या काय होईल ते!''

नारदाचे ते भाषण ऐकून मारूतीला विलक्षण स्फूर्ती आली. त्याने लगेच अतिविराट रूप धारण केले. आपल्या खांद्यावर रामलक्ष्मणांना घेतले. केस पिंजारले आणि रोमरोमांवर अठरा पद्मे वानरदल तसेच, अयोध्येच सैन्य बसवून काखेत बिभीषणाला घेतले.

तेव्हा नारदमुनी म्हणाले, "महारुद्रा, या दुसऱ्या काखेत आम्हांलाही घ्या. पाहू द्या तरी आम्हांला हा तुमचा युद्धाचा सोहळा." मारूतीने मग त्यांनाही दुसऱ्या बगलेत धरून एक पाय अयोध्येत तर दुसरा पाय थेट त्या दधिसमुद्रातील शतमुखी रावणाच्या बेटावर ठेवला. तेथे रामलक्ष्मणासह सर्वांना खाली उतरवून हनुमानाने त्या बेटाला वेढा टाकला आणि जोराने भुभुःकार केला.

तो अकस्मात अघटित प्रकार पाहून शतमुखी रावण गडबडून गेला. तथापि, त्याने बिभीषणाला पाहताच सारा प्रकार तत्काळ जाणला आणि ताबडतोब प्रतिहल्ला सुरू केला. बाणांचा वर्षाव, हलकल्लोळ, अस्त्रांचे तुंबळ रणकंदन यामुळे ते सारे बेट डळमळू लागले. समुद्र उफाळू लागला. दोन्ही पक्ष समर्थ. कोणीच कोणाला ऐकेना; पण त्या युद्धात शतमुखी रावणाचीच सरशीदिसू लागली. त्याने सारे वानरसैन्य आणि अयोध्येचे वीर मूर्च्छित पाडले.

शतमुखी रावणाच्या मायामोह अस्त्राने मग बिभीषण आणि राम-लक्ष्मण यांच्यावर प्रभाव चालविला. त्यांना गुंगी येऊ लागली. ते पाहून नारदमुनी गंभीरपणे म्हणाले, "रामा, हा दैत्य शिववरदायी आहे. तो तुम्हांला आटोपणारच नाही. आता याचा नाश करण्यास फक्त सीतादेवीच तेवढी समर्थ आहे. कारण ती आदिमाया दिव्यशक्ती आहे! तिच्या पतिभक्तीची शक्ती विलक्षण आहे! श्रेष्ठ आहे!"

"त्या लंकेश दशमुखी रावणाचा नाश खरे पाहता सीतेनेच केला. तुम्हांला तिने फक्त निमित्तमात्र बनविले. आता या शतमुखी रावणाचा वध फक्त सीताच करील. म्हणून म्हणतो या वेळी तुम्ही हा तुमचा अवमान न मानता सीतेला प्रत्यक्ष येथे आणा. तिचा तो सन्मान होईल!"



आश्चर्याने थक्क झालेल्या श्रीरामाने नारदाचा तो सल्ला ऐकून हनुमानाकडे केविलवाणी दृष्टी टाकली. ते पाहून तो वायुपुत्र मारुती मनी उमजला आणि लगेच उड्डाण करून थेट अयोध्येत सीतेच्या महालाकडे गेला.

पाहतो तर महाराणी सीता माता झोपलेली. आता? झोप मोडणे हे तर महापाप! मग मारूतीने आपल्या शेपटीने तो संपूर्ण महाल उचलून थेट रणभूमीवर आणला. सारेजण थक्क झाले. रामाने सीतेला जाग आणली. सीता दचकून उठली.

रामाने तिला त्या शतमुखी रावणाशी युद्धाची वार्ता थोडक्यात सांगून तिच्या हाती धनुष्यबाण दिले. रामप्रभूला वंदन करून सीतेने मग अती प्रचंड मायारूप धारण केले. बाणांच्या वर्षावाने आकाश फाटले.

शतमुखी रावणही काही कमी नव्हता. तो विकट हास्य करीत म्हणाला, "वाहवा! रामा! तुझा महिमा अगाध आहे! अरे माझ्याशी युद्ध करण्याला तू तुझ्या स्त्रीला पाठविलेस? तुझ्या पुरुषार्थाला हा कलंकच आहे; पण ही सीता म्हणजे आदिमाया आदिशक्ती हिच्या भक्तीची शक्तीही श्रेष्ठच आहे. हिचे कुंकू मी कसे पुसणार? ठीक आहे."

"रामा, आज मला आदिमाया-चित्शक्तीच्या हस्ते मरण आले तरी हरकत नाही; पण मी लढता लढताच हे मरण पत्करीन!" असे म्हणून त्या शतमुखी रावणाने पुनः सीतेवर बाणांचा वर्षाव सुरू केला.

सीतेचे आदिमायेचे प्रचंड रूप ! तिच्यावर त्या शतमुखीच्या बाणांचा काहीच प्रभाव चालेना. मग ती सीता घनगंभीर आवाजात

म्हणाली, "रावणबुद्धी म्हणजे दुष्टबुद्धी! त्या लंकापतीची बुद्धी फक्त दहा ठिकाणी दहाच प्रकारे विभागलेली होती; पण तुझी शत ठिकाणी, शंभर प्रकारे विभागलेली आहे. तू श्रीरामप्रभूच्या भक्ताचा-बिभीषणाचा अपमान केलास! याचे आता हे घे फळ!" असे म्हणून सीतेने आपला 'श्रीराम' म्हणून एक अतिशक्तिशाली बाण त्या शतमुखी रावणावर सोडला.

निमिषार्धात त्या बाणाच्या आघाताने तो रावण धाडकन जमिनीवर पडला आणि "जय सीताराम" असे म्हणत त्याने प्राण सोडला. शतमुखी रावण पडलेला पाहून त्याचे सारे सैन्य पळून गेले. मग सीतेने आपले पहिले सौम्यरूप धारण केले. युद्ध संपले. मारूतीने सारे वानरदल आणि अयोध्येचे वीर उठवून रामलक्ष्मण, बिभीषण, नारद या सर्वांसह पुन: पहिल्याप्रमाणे तो लंकेत आला! तो सारा प्रकार पाहून पुंडरीक शरण आला. रामाने थाटाने बिभीषणाला पुन: लंकेच्या गादीवर बसविले आणि मारूतीच्या साहाय्याने ताबडतोब अयोध्येत येऊन सूर्योदयापूर्वी आपल्या त्या साधनद्वादशीव्रताचे पारणे केले. नारदाची पूजा करून हनुमानासह वानरांना यथेच्छ भोजन दिले. त्या वेळी राम आणि सीता कृतार्थ झाली.

नारायण म्हणाले, "लक्ष्मी, आता पुढे सोळाव्या अध्यायात या पंचपर्वानंतर स्मितविलासिनी या अप्सरेची कथा सांगणार आहे. ती तू शांतपणे ऐक."

●●●



## अध्याय सोळावा : स्मितविलासिनीची कथा

विष्णू म्हणाले, "लक्ष्मी, अधिकमासात लोकांनी भगवान पुरुषोत्तमाप्रीत्यर्थ आणि आपल्या कल्याणासाठी स्नान-दानादी व्रते नियम करावीत. त्या पुण्याईच्या योगाने स्वत:चा तर उद्धार होतोच; पण आपली कुटुंबीय मंडळी, आप्तेष्ट आणि इतरही काही मंडळींचा उद्धार होत असतो. यासंबंधी तुला मी एक कथा सांगतो ती ऐक!"

इंद्रलोकात स्मितविलासिनी नावाची एक सुंदर अप्सरा होती. कुबेराघरी ती सेवेला सतत असायची. एकदा ती लावण्यलता पृथ्वीवर कुरूक्षेत्रात आपल्या सख्यांसह विहारासाठी आली होती.

यथेच्छ जलविहार केल्यानंतर त्या ओलेतीने त्या वनातील सुंदर सुंदर फुलांचा एक मोठा सुरेख हार केला होता. तो हार पाहून तिच्या सख्या थट्टेने तिला म्हणाल्या, "बाई गं ऽ आता हा हार तू कोणाच्या गळ्यात घालणार? हार घ्यायला तुझ्यापुढे कोण भाग्यवान येणार?"

तेवढ्यात लाजून त्या ओलेतीने सभोवार नजर टाकली तो काय नवल! त्या जलाशयाकडे स्नानासाठी एक तेजस्वी ऋषी येताना दिसले. त्यांना पाहून ती स्मितविलासिनी एकदम काममोहित झाली.

ती त्या तेजस्वी ऋषीकडे धावतच गेली आणि त्या कामांध अप्सरेने कसलाही विचार न करता हार त्या ऋषीच्या गळ्यात घातला! त्या वेळी तिच्या त्या सख्यांनी टाळ्या वाजवून आनंद व्यक्त केला; पण हे काय भलतेच! हाराचा तो प्रकार आणि ती धीट, सुंदर अप्सरा पाहून ते ऋषी एकदम संतापले आणि खडसावून

तिला म्हणाले, "दुष्ट स्त्रिये, हे काय धाडस केलेस ? मी दुर्वासमुनी आहे! माझ्याशी हा अतिप्रसंग करणाऱ्या कुलटे, तू पिशाच्चिनी होशील!" असा शाप देऊन दुर्वासांनी कमंडलूतील पाणी तिच्या अंगावर फेकले.

ती दुर्वासांची शापवाणी आणि ते कमंडलूतील पाणी यांचा परिमाण तत्काळ घडला. ती अप्सरा स्मितविलासिनी एकदम पिशाच्चिनी झाली. तिचे ते अक्राळविक्राळ रूप पाहून आणि तिने मारलेली कर्कश किंकाळी ऐकून त्या थट्टेखोर सख्या भीतीने गांगरून तेथून पळून गेल्या. दुर्वास ऋषी आपल्या शिष्यगणांसह तेथून निघून गेले. राहिली ती फक्त एकटी पिशाच्चिनी!

"काय बाई तरी! कसा हा भलताच कर्मभोग आला! रंगवायला गेले एक चित्र, तर झाले हे असे विचित्र! हाय, हाय आता ही पिशाच्चयोनी! किती भयंकर जीवन हे!" असा पश्चात्ताप करीत ती स्मितविलसिनी रानोमाळ भटकू लागली. अन्नपाण्यावाचून तडफडू लागली.

असे बरेच दिवस झाले. पुढे अधिकमास आला. याज्ञवल्क्य मुनींची कन्या कांची तपस्विनी त्या पर्वणीत आपल्या सख्यांसह सागरसंगमावर स्नानासाठी चालली होती. वाटेत एका अरण्यात तिला ती पिशाच्चिनी भेटली. त्या तपस्विनीला पाहताच पिशाच्चिनीने एकदम तिच्यापुढे येऊन तिचे पाय धरले.

पिशाच्चिनी म्हणाली, "तपस्विनी, पुण्यवान माते, माझा उद्धार कर! मी इंद्रलोकीची अप्सरा आहे; परंतु माझ्या हातून घडलेल्या अपराधामुळे मला ही योनी प्राप्त झाली आहे. तुझ्या व्रतपुण्याईचा थोडासा अंश मला दान देऊन माझा उद्धार कर!"

पिशाच्चिनीची ती आर्जवाची विनंती ऐकून त्या तपस्विनीला



तिची दया आली. तिने लगेच हातात पाणी घेऊन "माझे अधिकमासातील स्नान, दान, व्रताचे फक्त एकच दिवसाचे पुण्य मी हिला दान दिले." असे म्हणून ते पाणी पिशाच्चिनीच्या अंगावर फेकले. तोच काय आश्चर्य! ती पिशाच्चिनी एकदम दिव्यस्वरूपाची झाली. तत्काळ ती स्वर्गात निघून गेली. तिचा उद्धार झाला.

भगवान म्हणाले, "लक्ष्मी, आता पुढील सतराव्या अध्यायात मी तुला स्नानाच्या पुण्यदानाची एक कथा सांगतो ती तू ऐक!"

●●●

## अध्याय सतरावा : धर्मशर्माची कथा

अधिकमासातील स्नानदानादी व्रत-नियमांचे महत्त्व सांगत असताना भगवान विष्णू लक्ष्मीला म्हणाले, "कमले, ही व्रते किंवा दान संपूर्ण महिनाभर केली पाहिजेत असे नाही. आपली प्रकृती आणि परिस्थिती पाहून यथाशक्ती व्रते करावीत. महिनाभर प्रातःस्नानाचा नियम जर सोसणार नसले तर निदान तीन दिवस तरी स्नाने केली पाहिजेत; त्यायोगे पुष्कळ पुण्य पदरी पडते आणि मोक्षपदाची प्राप्ती होते."

यांसंबंधीची एक कथा मी तुला सांगतो ती ऐक. दक्षिणगंगा गोदावरीच्या काठी प्रतिष्ठान किंवा पैठण नावाचे एक महान पुण्यक्षेत्र आहे. तेथे धर्मशर्मा नावाचे एक विद्वान पंडित आपल्या काशी नावाच्या धर्मपत्नीसह राहात होते. त्यांच्या पोटी संतान नव्हते. तरीही ती उभयता समाधानाने परोपकाराची धर्मकृत्ये करीत आपले जीवन कंठीत असत.

वृद्धापकाळ झाला. त्यांना आता दररोज गंगेवर जाऊन नित्यनियमाने स्नान करणे अगदीच अशक्य झाले. तशातच अधिकमास आला. या पुण्यकाळात गंगास्नान करणे महत्त्वाचे; पण अशक्तपणामुळे ते त्यांना शक्य नव्हते म्हणून त्यांनी ठरविले, की निदान तीन दिवस तरी नेमाने गंगास्नान करायचेच!

झाले! केलेल्या दृढसंकल्पाप्रमाणे ती दोघे अगदी भल्या पहाटेच उठायची. एकमेकांचे हात धरून कसेतरी गंगेवर जायची. उभयतांनी गंगेत यथाविधी निष्ठापूर्वक प्रात:स्नाने करायची आणि परत रखडत घरी यायची. असा नियम दोन दिवस छान पार पडला; पण तिसरे दिवशी मात्र एक महान चमत्कार झाला.

धर्मशर्मा आरि काशीबाई तिसऱ्या दिवशी अगदीच लवकर उठली आणि गंगेवर गेली. स्नान करती झाली. परत घराकडे निघाली. त्या वेळी अंधारच होता. त्या अंधारात वाटेवरच त्यांच्यासमोर एक भयंकर पिशाच्च येऊन उभे राहिले.

बापरे! काय तो त्या पिशाच्चाचा अवतार! भयंकरच! केस विस्कटलेले, पिंजारलेले! मोठे पोट, लाल-लाल डोळे, नखांचे वेटोळे, अस्थिपंजर शरीर, अचकट विचकट सुळ्याचे दात, असे ते विलक्षण पिशाच्च नग्नावस्थेत वाटेतच उभे राहिलेले!

त्या पिशाच्चाला पाहताच काशीबाई घाबरून गेल्या; पण धर्मशर्मा मात्र धीटपणाने त्याला म्हणाला, "कोण रे तू? असा आमच्या वाटेत उभा का? बाजूला हो. रस्ता सोड!" त्यावर पिशाच्च नम्रपणे म्हणाले, "हे पुण्यवान पुरुषा, आज मी तुम्हांला मुद्दाम अडविले आहे! माझा उद्धार करावा!"

"म्हणजे हा काय प्रकार आहे? तुझा उद्धार करायचा म्हणजे काय?" हे प्रश्न धर्मशर्माने त्या पिशाच्चाला विचारले तेव्हा ते



पिशाच्च शांतपणे म्हणाले, "महाराज, पूर्वजन्मात मी एक धनवान श्रीमंत सावकार होतो. लोकांना अडवून, छळून मी अमाप धन मिळविले. ते धन पालथ्यानगरीत खोल जमिनीत पुरून टाकले. कसलाही दानधर्म किंवा पुण्यकृत्य केले नाही! मग माझा मृत्यु झाला. केलेल्या पापामुळे मला भयंकर यमयातना भोगाव्या लागल्यानंतर मी दोन जन्म चांडाळयोनी भोगली. तेथेही मी खूप नीचकृत्ये केली. त्या पापांमुळे मला विलक्षण नरकयातना भोगाव्या लागल्या. नंतर मी हा असा पिशच्चयोनीत येऊन पडलो आहे. आता माझा उद्धार करा! मला मोक्ष पाहिजे. पुनर्जन्म नको यापुढे. कृपा करा आणि तुमच्या पुण्याचा थोडा तरी अंश मला दान करा!"

धर्मशर्माला त्या भूतपिशाच्चाची दया आली. त्याने हातात पाणी घेऊन आपल्या त्या तीन दिवस गंगास्नानाच्या पुण्यातील एक दिवस स्नानाचे पुण्य त्याला दान दिले!

त्या दानाचे पवित्र पाणी अंगावर पडताच पिशाच्चाचा देह एकदम दिव्य झाला. त्याला स्वर्गातून विमान आले आणि तो दिव्य देहधारी पुरुष स्वर्गात निघून गेला.

भगवान म्हणाले, "लक्ष्मी, धर्मशर्माने त्या पिशाच्चाचा उद्धार केला, ही कथा ऐकलीस. आता अठराव्या अध्यायात मी तुला काशीक्षेत्रातील मंगळागौरीची कथा सांगणार आहे ती तू ऐक!"

●●●

## अध्याय अठरावा : काशीतील मंगळागौरी

विंध्यपर्वताच्या एका विभागात अमरकंटक नावाची पर्वतश्रेणी आहे. तेथे नर्मदा नावाची एक पुण्यसलिला नदी आहे. नर्मदेच्या

दोन्ही तीरांवर रम्य वनश्री असून तेथे स्वत: भगवान शंकर पार्वतीसह क्रीडा करण्यास येत असतात. अनेक देवांचेही वास्तव्य त्या ठिकाणी आहे.

त्या नर्मदेच्या सागरसंगमाजवळ भृगुकच्छ नावाची एक दिव्य नगरी आहे. त्या नगरीत पूर्वी कुळशर्मा आणि त्याची पत्नी कुशावती आनंदाने संसार करीत होती. त्यांच्या पोटी एक कन्यारत्न झाले. मेधावती हे त्या कन्येचे नाव.

मेधावती अतिशय सुंदर होती, गुणवानही होती. ती उपवर झाल्यावर पद्मनाभ नावाच्या एका रुपवान गुणी तरुणाशी तिचा विवाह झाला. त्या वधुवरांचा संसार अतिशय प्रेमाने चालला; पण थोड्याच दिवसांनी त्यांच्या दुर्दैवाने भयंकर संकट ओढवले. एके दिवशी तो पद्मनाभ नर्मदा नदीत स्नान करीत असता एका मगरीने त्याला खोल पाण्यात ओढून नेले. पद्मनाभ बुडाला. सर्वत्र हाहा:कार झाला. मेधावतीच्या शोकाला तर सीमाच राहिली नाही. ती विधवा झाली. मातपित्याला खूप दु:ख झाले; पण काय करणार!

पुढे काही दिवसांनी अधिकमास आला. मेधावतीने त्या महिन्यातील उपवास, नक्तभोजन, नित्यस्नान, दीपदान, अन्नदान, वस्त्र-पात्रदान, अपूपदान, मौनभोजन अशा प्रकारची यथाशक्ती व्रते केली. नियम पाळले. भगवान पुरुषोत्तमाची, राधाकृष्णाची पूजा, दर्शन, नामस्मरण वगैरे सर्व केले.

उद्यापनाच्या दिवशी ती नदीवर गेली असताना शिवपार्वती तेथे येऊन त्या मेधावतीला त्यांनी आपल्या विमानात नेले. ती सदेह कैलासात गेली. पार्वतीने तिला निरखून पाहिले तर ती विधवा! कपाळी कुंकू नाही! हरकत नाही! मग पार्वतीने विचार केला, "मेधावतीला पवित्र देवताच बनवायची!"



मग ती मेधावती माता पार्वतीबरोबर सतत राहू लागली. तिचे मन रमले. वैधव्याची दु:खे हळूहळू विसरली. तिकडे भृगुकच्छ नगरीत आकान्त झाला होता. मेधावती जी नर्मदेवर स्नानास गेली होती, तिचा पुढे पत्ताच नव्हता. तिलाही पतीप्रमाणे नदीतील मगरीने नेली असावी अशा कल्पनेने सारेजण दु:खी झाले होते. कुळशर्मा आणि कुशावती यांनी खूप शोक केला; पण मृत्युपुढे कोणाचे काय चालणार! मेधावती कैलासात पार्वतीजवळ गेल्याचे तर कोणालाही माहीत नव्हते!

एके दिवशी महादेवाच्या भेटीला श्रीविष्णू आले तेव्हा त्यांनी मेधावतीला पाहिले. ते म्हणाले, "ही स्त्री फार पुण्यवान आहे. हिने अधिकमासातील व्रते निष्ठेने केली आहेत. तिला त्यामुळे वास्तविक गोलोकात स्थान मिळायला पाहिजे; पण ती येथे कैलासात कशी?"

मग पार्वतीने मेधावतीची सर्व हकीगत सांगितली. ती माझी सखी आहे. हिला मी सौभाग्याचा अक्षय्यवर दिला आहे. हिच्या दर्शनाने स्त्रियांचे मंगल होईल. कल्याण होईल. ते ऐकून भगवान विष्णूलाही आनंद वाटला.

नंतर शंकर-पार्वती, ती मेधावती आणि श्रीविष्णू हे काशीक्षेत्री आले. तेथे श्रीविष्णूंनी नीलकंठेश्वर महादेवाची लिंगस्थापना केली. त्या सोहळ्याच्या वेळी मेधावतीने माता पार्वतीच्या चरणी आपला देह ठेवला. मेधावती पावन झाली, ती मोक्षपदाला गेली.

पार्वतीने मेधावतीच्या स्मरणार्थ एक मंदिर बांधले. त्या मंदिरात त्या अक्षय सौभाग्यवती पुण्यशील मेधावतीची मूर्ती 'मंगळागौरी' (गौरीची पवित्र मंगल सखी) म्हणून स्थापन केली. काशीतील त्या मंगळागौरीच्या दर्शनाला अद्यापही लाखो

लोक जातात. आणि धन्य होतात.

भगवान विष्णू म्हणाले, "लक्ष्मी अधिकमास व्रताच्या पुण्याईने मेधावती मंगळागौरी झाली ती कथा मी सांगितली. आता पुढे एकोणिसाव्या अध्यायात विप्रदासाची कथा सांगणार आहे, ती तू शांतपणे ऐक."

●●●

## अध्याय एकोणिसावा : विप्रदासाची कथा

लक्ष्मी म्हणाली, "भगवंता, अधिकमासातील व्रते ज्यांनी केली त्या पुण्याईमधील थोडा अंश इतरांना दान देऊन त्यांचा उद्धार केला; ह्या कथा फारच उद्बोधक आहेत. आता अशीच आणखी एखादी कथा मला सांगावी!"

विष्णू म्हणाले, "होय, या अध्यायात मी तुला जी विप्रदासाची कथा सांगत आहे. तीही त्याच प्रकारची आहे. ऐक!"

दक्षिण देशात गोकर्णगिरीजवळ शिवकांची या नावाची एक दिव्य नगरी आहे. शिवगौरीचे ते आवडते स्थळ आहे. ती नगरी म्हणजे मंदिरांची अतिसुंदर रम्य नगरी आहे. त्या नगरीत कोणी विप्रदास नावाचा एक सेवक आपल्या पत्नीसह तेथील विद्वान पंडितांच्या घरी सेवाकर्मे करून आपला उदरनिर्वाह चालवीत असे.

एकदा अधिकमासात त्या नगरीतील लोक अनेक प्रकारची स्नाने, दाने, व्रते, नियम करीत असताना ती पाहून विप्रदासाची पत्नी म्हणाली, "नाथ, आपणही या महिन्यात काही पुण्यकर्मे करावी, अशी माझी इच्छा आहे."



त्यावर विप्रदास तिला म्हणाले, "प्रिये, आपण तर दरिद्री, गरीब आहोत. ती पुण्यकर्मे, दानव्रते करण्यासाठी आपणाजवळ द्रव्य नाही. केवळ लोकांची सेवाकार्ये करून आपण जगत आहोत. मग ती पुण्यकर्मे कशी करणार?"

मग त्या दोघांनी विचार केला, की या अधिकमासात फक्त स्नानाच्या व्रताचा नियम आपण जर केला तर त्याला फक्त शरीरश्रमच खर्चावे लागतील, द्रव्याची आवश्यकता नाही! बस! ठरला हा निश्चय!

नंतर त्या गोकर्णगिरीतून वाहणारी गोकर्णा गंगा या पवित्र नदीवर -गावापासून दूर- सारणेश्वर मंदिराजवळ जाऊन त्या उभयतांनी दररोज भल्या पहाटेच उठून जावे, स्नान करून सारणेश्वराचे दर्शन घ्यावे आणि सूर्योदयापासून आपली नित्याची सेवाकार्ये करावी, असा क्रम चालविला. संपूर्ण अधिकमास त्यांना तो नियम निष्ठेने पाळला.

उद्यापनाच्या दिवशी विप्रदास आणि त्याची पत्नी अपरात्रीच उठले. दूर गोकर्ण पर्वताच्या पायथ्याशी त्यांनी तीर्थस्नान केले. देवदर्शन घेतले आणि ते घराकडे परत निघाले, तो वाटेत काय चमत्कार घडला!

सातशे भुते-प्रेते त्यांच्याभोवती जमा झाली. अंधारातच त्यांच्या त्या विचित्र आणि विलक्षण आकृत्या नाचत, हातवारे करीत विप्रदासाभोवती पिंगा घालू लागल्या. तो विलक्षण देखावा पाहून विप्रदासाच्या पत्नीची तर बोबडीच वळली. किंकाळी फोडून ती मूर्च्छित पडली.

विप्रदासाने धैर्य धरून त्या भुतांच्या नायकाला प्रश्न केला. "काय रे? हा काय प्रकार आहे? आम्हांला त्रास का देता?

कशासाठी आमच्याभोवती हा गराडा घातला आहे ?''

तेव्हा तो भुतांच्या नायक म्हणाला, '' हे पुण्यवान महापुरुषा, तुम्ही उभयतांनी या अधिकमासात स्नानाचे जे थोर पुण्य मिळविले आहे त्यातील सात दिवस स्नानाचे पुण्य आम्हांला दान देऊन आम्हां सातशे भुतांचा उद्धार करा!''

मग विप्रदासाच्या डोक्यात प्रकाश पडला. त्याने लगेच हातात पाणी घेऊन दान संकल्प केला आणि ते पाणी त्या भूतसमुदायावर फेकले. तोच काय नवल! त्या सर्व भुतांचे देह दिव्यस्वरूपी झाले. आकाशातून विमाने आली. त्या दिव्यदेहधारी लोकांनी विप्रदासाचे आभार मानले.

विष्णू म्हणाले, '' लक्ष्मी, अधिकमासातील केवळ स्नानव्रताचा आणि पुण्यांशदानाचा असा महिमा आहे! अशीच कथा सौराष्ट्रदेशीच्या सोमशर्मा नावाच्या पुण्यवान पुरुषाची आहे. त्यानेही असाच एका राक्षसाचा उद्धार केला. आता विसाव्या अध्यायात मी अधिकमासमाहात्माची आणखी कथा सांगेन, ती तू शांतपणें ऐक!''

●●●

## अध्याय विसावा : सोमशर्माची कथा

विष्णू म्हणाले, '' लक्ष्मी, पूर्वी सौराष्ट्र देशात प्रभासपट्टण नावाच्या एका गावात सोमशर्मा नावाचा गृहस्थ होता. तो मोठा निष्ठावान, सदाचारी आणि दानशूर असा होता. त्याने अधिकमासातील अनेक व्रते आणि नियम केले होते. नित्य



प्रात:स्नान, दीपदान, अन्नदान, तांबूलदान वगैरे यथाशक्ती दानेही केली होती.

अधिकमासाच्या उद्यापनाच्या दिवशी तो सोमशर्मा असाच अगदी भल्या पहाटे उठला. नदीवर गेला आणि स्नान करून परत घराकडे निघाला. त्या वेळी अंधारच होता. तेव्हा वाटेत काय चमत्कार!

एक भयंकर अक्राळविक्राळ आणि धिप्पाड राक्षस सोमशर्माच्या पुढे येऊन उभा राहिला. बापरे! काय त्याचे रूप! लांब केसाळ हात, बटबटीत डोळे, विशाल जबडा! त्याला पाहून सोमशर्मा दचकला. परंतु न घाबरता त्याने त्या राक्षसाला विचारले, '' कोण रे तू? काय हे तुझे हिडिस रूप! माझ्या वाटेत असा आडवा का आलास?''

त्यावर तो राक्षस गंभीर आवाजात म्हणाला, '' हे दयाळू पुण्यपुरुषा, मी राक्षसयोनीत फिरतो आहे; पण आता तुम्ही माझा उद्धार करा!''

'' म्हणजे काय? उद्धार कशासाठी? तू हा असा राक्षसयोनीत... '' सोमशर्मा त्या राक्षसाला विचारीत होता तोच तो राक्षस पुन: गंभीर आवाजात म्हणाला, '' महाराज, माझा पूर्वजन्मीचा इतिहास फारच विचित्र आहे, तो ऐका आणि मग मला या भयंकर योनीतून मुक्त करा. माझा उद्धार करण्यास तुम्ही समर्थ आहात. तुमचे हे अधिक मासातील स्नानाचे थोडेसे तरी पुण्य मला दान करा. त्यायोगे मला सद्‌गती मिळेल!'' मग त्या राक्षसाने आपली पूर्वजन्मीची हकीगत सांगितली. ती अशी:

'' पूर्वजन्मात मी एका मोठा धनवंत सावकार होतो. संतती, संपत्ती, अपार वैभवात मी नांदत होतो. कशाचीही वाण मला

नव्हती. एके दिवशी एक गृहस्थ माझ्याकडे आला. तो म्हणाला, ''मला काशीयात्रेला जायचे आहे. माझा हा दागिन्यांचा डबा आपणाकडे ठेवा. या डब्यात सोन्याचे दागिने शंभर तोळ्यांचे आणि दहा हजार रुपये आहेत पाहा. मी काशीयात्रेहून आल्यावर ही माझी ठेव परत नेईन आणि या ठेवीचा सांभाळ केल्याबद्दल तुमचा मोबदला देईन.''

मी त्याची ती ठेव माझ्याकडे ठेवून घेतली. पुढे तो गृहस्थ बारा वर्षांनी काशीयात्रेहून आला आणि त्याची ती ठेव मला परत मागू लागला, तेव्हा मी चक्क नाकबूल झालो. त्याला म्हणालो, ''कसली ठेव? वारे वा! चालतो हो! बिचारा काय करणार! पुरावा काय होता! मग तो मला तळतळाट देऊन निघून गेला.''

थोड्यात दिवसांनी मला मरण आले. यमदूतांनी माझा खूप छळ केला आणि शेवटी या राक्षसमयोनीत मला टाकले. या राक्षस जन्मात मला फार त्रास होत आहे! माझ्या उद्धारासाठी तू मला पुण्य दान कर!'

राक्षसाचा तो इतिहास ऐकून सोमशर्माला त्याची दया आली. त्याने हातात पाणी घेऊन संकल्प केला. आपल्या अधिकमासातील स्नानाचे सात दिवसांचे पुण्य त्या राक्षसाला दान दिले. त्या पुण्याईचे पाणी अंगावर पडताच चमत्कार असा झाला की त्या राक्षसाचा देह एकदम दिव्य झाला आणि स्वर्गातून विमान येताच तो त्या विमानात बसून, हात जोडून सोमशर्माला धन्यवाद देत निघून गेला. विष्णू म्हणाले, ''लक्ष्मी, सोमशर्माची ही कथा ऐकलीस. आता पुढे एकविसाव्या अध्यायात मी तुला अधिकमासातील स्नानाच्या पुण्याईची आणखी कथा सांगणार आहे, ती तू चित्त देऊन ऐक!''

●●●



## अध्याय एकविसावा : विप्रदासाची कथा

नारायण म्हणाले, ''लक्ष्मी, विराट नावाच्या देशात माहुर नावाचे एक क्षेत्र आहे. त्या ठिकाणी परशुरामाची माता रेणुकादेवी आणि दत्तात्रेयाची माता अनसूयादेवी यांचा निवास आहे. ते माहूर म्हणजे मातापूर. जमदग्नी आणि अत्री या महान तेजस्वी ऋषीमुनींची तपोभूमी आहे. तेथे अनेक प्रकारची धार्मिक व्रते करणारे लोक आहेत.

पूर्वी त्या माहूर क्षेत्रात असाच एक धर्मनिष्ठ आणि धनवान असा विप्रदास नावाचा एक गृहस्थ राहात होता. तो ऋषिमुनींची सेवा मोठ्या निष्ठेने करायचा. अतिथींना दानधर्म करायचा आणि अधिकमास आल्यावर त्यातील अनेक व्रते-नियम पाळून स्नानदानादी पुण्यकृत्ये करायचा. त्याची पत्नीही त्याच्या त्या धर्मकार्यात आनंदाने सहभागी होत असे. दानधर्मात तीही भरपूर धन खर्च करायची.

पुढे काही दिवसांनी त्या विप्रदासाला कुष्ठरोग झाला. त्या महारोगामुळे त्याचे शरीर अत्यंत विद्रूप झाले. हाय रे दैवा! हे काय नशिबी आले! इतकी पुण्यकर्मे केली आणि त्याचे फळ काय मिळाले! अशा प्रकारे दुःख करीत तो विप्रदास दिवस कंठीत राहिला.

''या कुष्ठरोगाच्या भयंकर दुःखापेक्षा मरण बरे!'' असे म्हणून त्या विप्रदासाने आपली सर्व धनंसपत्ती पुत्राच्या स्वाधीन केली. थोडा वाटा पत्नीसाठी राखून ठेवला. थोडा वाटा दानधर्मात वाटून टाकला आणि थोडा वाटा स्वतःबरोबर घेऊन त्याने आपला गाव

सोडला. आता निरनिराळ्या धर्मक्षेत्रांत जाऊन तीर्थयात्रा करायची आणि जेथे मरण येईल तेथे आपल्या देह ठेवावा असा विचार विप्रदासाने केला. त्याचा तो विचार पत्नीलाही पटला. ती म्हणाली, "मी तुमच्याबरोबर येते!" पण विप्रदास म्हणाला, "नको तू पुत्राजवळ राहा. माझे एकट्याचे पाप मला एकट्याला भोगू दे. माझ्या यातना मलाच भोगल्या पाहिजेत!"

नंतर तो विप्रदास घरदार सोडून एकटाच प्रवासाला गेला. जवळपासची तीर्थक्षेत्रे हिंडून तो गौतमी गंगाकाठी एका पुण्यवान क्षेत्रात जाऊन राहिला. दररोज गंगास्नान, यथाशक्ती दान, उपवास, व्रत-नियम पाळून सतत परमेश्वराचे ध्यान- मनन- चिंतन- नामस्मरण करीत तो तेथे काळ कंठीत राहिला.

शरीराच्या त्या कुष्ठरोगव्याधीमुळे त्याला पूर्वीसारखी ऋषिमुनी, गोब्राह्मणांची सेवा करणे शक्य नव्हते. त्या पुण्याईला मुकल्याचे त्याला खूपच दुःख वाटे; पण भोगापुढे इलाजच नव्हता. आता फक्त गंगास्नान आणि गंगाजल तीर्थप्राशन हेच त्याचे औषध आणि तोच मुक्तीचा उपाय हेच ध्येय ठेवून तो वागायचा आणि म्हणायचा– "औषधं जान्हवीतोयं। वैद्यो नारायणो हरि:।"

पुढे लवकरच अधिकमास आला. त्या महिन्यात त्याने निष्ठापूर्वक गंगास्नान आणि नित्य तीर्थप्राशन एवढेच व्रत पूर्ण केले. महिन्याच्या शेवटी त्याने पहाटेच गंगास्नान केले. तीर्थ घेतले आणि मुक्तीसाठी निष्ठेने भगवान पुरुषोत्तमाची प्रार्थना केली.

प्रार्थना संपताच डोळे उघडून पाहतो तर काय चमत्कार! त्याचा तो कुष्ठरोग पूर्णपणे बरा होऊन त्याचे शरीर आणि रूप अतिशय सुंदर बनलेले! तो आंनदातिशयाने ओरडला. अधिकमासातील त्या गंगास्नानाचे पुण्यफळ लोकांना दाखवू लागला.



तेवढ्यात आणखी चमत्कार! स्वर्गातून एक दिव्य विमान तेथे आले. विष्णुदूतांनी त्या विप्रदासाला सन्मानपूर्वक त्या विमानात बसविले आणि थेट गोलोकात नेऊन त्या भगवान पुरुषोत्तमाजवळ बसविले.

विष्णू म्हणाले, "लक्ष्मी, अशी आहे त्या विप्रदासाची कथा आणि अधिकमासातील गंगास्नानाचा थोर महिमा. आता पुढे बाविसाव्या अध्यायात द्विजशर्मा नावाच्या एका अभाग्याची कथा मी तुला सांगणार आहे, ती तू ऐक!"

●●●

## अध्याय बाविसावा : द्विजशर्मा आणि नारायण

लक्ष्मी म्हणाली, "नारायणा, अधिकमासातील स्नानाचा महिमा मला खूपच समजला; पण दानाचा महिमा म्हणजे कोणत्या दानाचे काय फळ मिळते ते मला तपशीलवार सांगा." तेव्हा विष्णू म्हणाले, "ठीक आहे. सांगतो!"

सोने, रूपे, चांदी, मोती, पोवळे ही दाने सर्वश्रेष्ठ आहेत. तांब्या-पितळेची आणि कांस्य धातूची भांडी दान दिली तर ते उत्तमच आहे. वस्त्रदान, अन्नदान, धान्य, द्रव्य ही दाने आणि उदकदान देणे ही दाने महान पुण्यकारक आहेत. तीस तीन अनारसे, बत्तासे, खारका, सुपाऱ्या किंवा फळे दान करणे हे अधिकमासातील विशेष पुण्यकारक आहे. घृतपात्र, तीळपात्र, सप्तधान्ये ही दाने द्यावीत. सर्व दानात गोदान करणे हे विशेष असे मोक्षदायी दान आहे.

गोदानाच्या अनेक कथा आहेत; परंतु अगदी आगळीच कथा मी तुला सांगतो ती लक्षात ठेवली पाहिजे.

माहिष्मती नावाची एक अत्यंत संपन्न अशी नगरी आहे. त्या नगरीत द्विजशर्मा नावाचा एक श्रीमंत आणि धर्मनिष्ठ असा गृहस्थ राहात होता. त्याची पत्नी आणि तो आनंदात राहून अनेक व्रतदाने, पुण्यकर्मे करी. बरेच दिवस झाले अर्ध्यावर त्या दोघांची वये होऊन गेली. पोटी संतान झाले नाही.

एके दिवशी ऐन दुपारी द्विजशर्माच्या घरी एक अतिथी आला. तो म्हणाला, " महाराज, मी फार भुकेला आहे. मला जेवण द्याल तर फार मोठे उपकार होतील!" त्यावर द्विजशर्मा म्हणाला, " अरे, अन्नदानासारखे महापुण्य मला घडेल तर ही संधी आम्ही कशी दवडणार? चल ये ! हातपाय धू आणि पाटावर बस. यथेच्छ पोटभर जेवण कर!" त्याचे जेवण झाल्यावर शांतपणे त्यांच्यात गप्पागोष्टी झाल्या तेव्हा द्विजशर्माला कळाले, की हा अतिथी म्हणजे अत्यंत गरीब माणूस आहे. याला आई, वडील, भाऊ, बहीण वगैरे कोणीही नातेवाईक नाही. जगाच्या पाठीवर हा एकटा जीव सदाशिव आहे. याचे नाव नारायण असे आहे.

हा नारायण आपल्या घरी पुत्राप्रमाणे राहावा. याने आपली सेवा करावी आणि आपणही याचे भरण-पोषण करावे! हा विचार द्विजशर्माने नारायणाला सांगितला आणि त्यानेही त्या विचारांला संमती दिली. झाले! द्विजशर्माच्या घरी तो नारायण आनंदाने राहून सेवा करू लागला.

काही दिवसांनंतर काय आश्चर्य! त्या द्विजशर्माची पत्नी गरोदर राहिली आणि तिला पुढे यथाकाळ पुत्ररत्नाचा लाभ झाला. नारायणाचा पायगुण म्हणून द्विजशर्माने त्याचेही खूप कौतुक केले.



द्विजशर्माच्या घरी पुत्रजन्माचा खूपच थाटाचा सोहळा पार पाडला. साऱ्या गावाला आनंद झाला.

पाचवीच्या रात्री एक विलक्षण प्रसंग घडला. सायंकाळी द्विजशर्माच्या बायकोने यथाविधी पाचवीची-सटवीची पूजा मनोभावे करून बाळाला तिच्यापुढे ठेवले. पूजा-दर्शन झाल्यावर सारेजण शांत होते. मध्यरात्र झाली. सारेजण डाराडूर झोपले होते. एकटा नारायण बाळंतिणीच्या खोलीच्या दाराशी जागत बसला होता. तेवढ्यात काय चमत्कार! एक अतिशय दिव्य तेजाची देवी बाळाला पाहून त्या खोलीबाहेर निघाली.

नारायणाने त्या देवीला पाहिले. नमस्कार केला आणि तिला अडवून नारायण म्हणाला, " हे देवी तू कोण आहेस?" तेव्हा ती देवी म्हणाली, " हे पुण्यपुरुषा तुला माझे दर्शन घडले हे छान झाले. मी यक्षिणी देवी आहे. मला सटवी म्हणतात. ब्रह्मदेवाने या बाळाच्या नशिबी कोणती अक्षरे लिहिली आहेत ती अक्षरे पाहून मी परत चालले आहे!"

देवीचे ते शब्द ऐकून नारायणाला आनंद झाला. तो म्हणाला, " मी धन्य आहे! सटवीदेवी, तू मला दर्शन दिलेस. मला पुण्यवान म्हटलेस. आता या बाळाच्या नशिबी ब्रह्मदेवाने लिहिलेली सर्व अक्षरे तू पाहून आलीस, तर कृपा करून मला सांग, की या बाळाच्या नशिबी पुढे काय काय लिहिले आहे ते!"

सटवी म्हणाली, " हे पुण्यपुरुषा, एक तर मी कोणाला दिसत नाही. बाळाच्या पाचवीच्या रात्री गुप्तपणे येते. बाळाची ब्रह्माक्षरे वाचते आणि निघून जाते; पण आज योग तुझा तुला माझे दर्शन घडले. छान झाले. आता तू विचारतोस या बाळाच्या नशिबी ब्रह्मदेवाने काय लिहून ठेवले आहे, ते मी तुला कसे सांगू?"

नारायणाने हट्टच धरला तेव्हा ती देवी म्हणाली, "द्विजशर्माच्या या पुत्राच्या नशिबी सुखसंपत्ती नाही! संसारही हा करणार नाही, फक्त ताक विकून आपला उदरनिर्वाह करील आणि गरिबीतच खूप वर्षे जगेल!" इतके सांगून सटवी झटकन निघून गेली.

नारायणाने विचार केला! हाय रे दैवा! काय हे या बाळाचे नशीब! असो. ब्रह्मलिखित अटळ आहे! असे मनाशी म्हणत नारायण गप्प बसला. त्याने ती हकीकत पुढे कोणालाही कधीच सांगितली नाही.

त्या बाळाचे बारसे करून संभ्रम हे नाव ठेवले. संभ्रम हळूहळू वाढू लागला. द्विजशर्माला पुत्राचे भारी कौतुक वाटे. तो त्याला शिकवून मोठा करीन म्हणे. नंतर पाच वर्षांनी द्विजशर्माच्या पत्नीला मुलगी झाली. आनंदात आणखी वाढ झाली. दुधात साखर पडली.

त्या कन्येच्या पाचवी-पूजनाच्या रात्रीही नारायण मुद्दाम बाळंतिणीच्या खोलीच्या दाराशी जागत बसला होता. पूर्वीप्रमाणेच मध्यरात्री पुनः सटवी देवी आली. तिने बाळाची ब्रह्माक्षरे वाचली. ती परत निघाली. नारायणाने तिला विचारलेच!

तेव्हा सटवीदेवीने सांगितले, की "या मुलीच्या नशिबी मातापित्याचे सुख नाही. लवकरच ही पोरकी होईल. पुढे हिचा विवाहही होणार नाही. तसेच, ही आपल्या सुंदर तरुण देहाची विक्री करून खूप वर्षे जगेल!–"

"हाय रे दैवा! काय हे ह्या मुलीचे नशीब! आपल्या धन्याला द्विजशर्माला म्हातारपणी झालेली ही दोन बाळे! पुत्र दरिद्री होणार. ताक विकून पोट भरणार आणि ही कन्या मातापित्याला घालवून पोरकी होणार! पुढे देहविक्री करणार! काय हा विचित्र योग! अरेरे! आपल्याला हे दुःख कसे सहन होणार!" असा शोक करीत



नारायण गप्प झाला. त्याने ती गोष्टी कोणालाही कधीच सांगितली नाही.

विधिलिखित ठरल्याप्रमाणे पुढे काही वर्षांनंतर द्विजशर्मा आणि त्याची बायको मरण पावली. ही दोन्ही बाळे उघडी पडली. नारायणाने कसातरी त्यांचा सांभाळ केला. शेवटी तोही उदास झाला आणि एके दिवशी त्या बाळांना सोडून गुपचूप दूर निघून गेला.

गावकऱ्यांना या सर्व गोष्टींचे खूपच दुःख झाले. त्यांनी संभ्रम बाळाला दुधासाठी एक चांगली गाय दान दिली. त्या गाईचे दूध पिऊन संभ्रम आणि त्याची ती बहीण आपले पोट भरीत. उरलेल्या दुधाचे ताक करून ते विकायचे आणि आपला उदरनिर्वाह चालवायचा असा दिनक्रम त्या संभ्रमाचा चालू झाला. एके दिवशी द्विजशर्माची ती मुलगी नदीवर पाणी आणण्यास गेली होती. तेव्हा तेथे एका श्रीमंत वेश्येचा तळ पडला होता. त्या वेश्येने ही सुंदर मुलगी पाहिली आणि तिला भुरळ घालून आपल्याबरोबर परगावी नेले.

बहीण बेपत्ता झाल्याचे पाहून संभ्रमाने खूपच शोक केला; पण दैवगतीपुढे कोण काय करणार! असो! नारायण म्हणाले, "लक्ष्मी, या दोघांची पुढील हकीगत आता तेविसाव्या अध्यायात तुला सांगतो!"

●●●

## अध्याय तेविसावा : संभ्रमाचे गोदान

बहीण बेपत्ता झाली त्यामुळे तो संभ्रम बाळ खूपच शोक करू लागला. गावकऱ्यांनी कशीबशी त्याची समजूत घातली. नंतर

थोड्याच दिवसांनी तो आपला पूर्वीचा ताक विकून पोट भरण्याचा धंदा करू लागला.

या बहीणभावांना अनाथपणे सोडून गेलेला तो नारायण तीर्थयात्रा करीत भटकत भटकत बारा वर्षे फिरला आणि एके दिवशी अचानक आपल्या गुरुगृही परत आला. संभ्रमाने प्रथम त्याला ओळखलेच नाही; पण नारायणाने त्याला बाळपणीची ओळख दिली. मातापित्याची आठवण दिली तेव्हा गळ्यात गळा घालून संभ्रम खूप रडला.

बहीण बेपत्ता झाल्याचे संभ्रमाने सांगितले तेव्हा नारायणाला वाईट वाटले; पण त्याला तिचे विधिलिखित माहीत होते म्हणून त्याने संभ्रमाला धीर दिला आणि सांगितले. "तू काही काळजी करू नकोस. आपण तिला शोधू." मग दोघांनी गाईचे दूध घेतले आणि ते गप्पागोष्टी करीत रात्री शांत झोपले.

रात्री नारायणाच्या मनात एक विचार आला. तो त्याने सकाळी संभ्रमाला सांगितला. नारायण म्हणाला, "बाळा, आता अधिकमास आला आहे. या महिन्यात स्नान- दान-व्रत-नियम केल्याने पुण्य मिळते आणि आपले मनातील हेतू पूर्ण होऊन सुखशांती मिळते. तर तू आता उद्या गोदानाचे पुण्य मिळवून सुखी हो!"

गोदान? म्हणजे..." संभ्रमाने विचारले तेव्हा नारायण म्हणाला, "गोदान म्हणजे ही तुझी गाय तू दान देऊन टाक आणि त्यावर दक्षिणा म्हणून तुझ्याजवळ जे काही द्रव्य असेल तेही दान दे! अधिकमासात हे असे गोदान करणे हे महान पुण्यकर्म आहे! उद्या सकाळीच गंगास्नान करून ये. सत्पात्री ब्राह्मणाला ही गाय दक्षिणेसह दान दे!"



"ते खरं; पण गुरु ही माझी गाय मी देऊन टाकल्यावर माझा ताकविक्रीचा व्यवसाय आणि उदरनिर्वाह यांची सोय काय?" संभ्रमाने विचारले. नारायण म्हणाला, "तू त्याची चिंता करू नकोस! त्या पुरूषोत्तम देवाला भक्ताची काळजी असते. तो परमेश्वर किडामुंगीपासून हत्तीपर्यंत सर्व प्राण्यांची काळजी घेतच असतो. तू हे गोदान कर. त्या पुण्याईने तुझे कल्याणच होईल बघ! मी सांगतो तसे कर!"

मग तो संभ्रमबाळ दुसऱ्या दिवशी सकाळीच गंगास्नान करून आला आणि त्याने यथाविधी आपल्या त्या गाईचे दान दिले. झाले! तो सबंध दिवस ते दोघे उपाशीच राहिले. रात्री पाणी पिऊन तसेच झोपले.

दुसऱ्या दिवशी नारायण पहाटेच उठला. गंगेवर गेला. स्नान करून त्याने पुरुषोत्तमाचे ध्यान केले. नेमके त्याच वेळी नारदमुनी तेथून चालले होते. त्यांनी त्या ध्यानस्थ नारायणाचे मनोगत जाणले. संभ्रमाचीही परिस्थिती जाणली आणि थेट ब्रह्मलोकात जाऊन पित्याची भेट घेतली.

नारद म्हणाला, "तात, तुम्ही या संभ्रम बाळाचे विधिलिखित जे लिहून ठेवले ते आता खोटे ठरत आहे. कारण त्याने आपली गाय दान देऊन टाकली आणि आता ताकविक्री करून उदरनिर्वाह करण्याचे काम बंद पडले आहे!"

ब्रह्मदेवांनी अंतर्ज्ञानाने तो प्रकार जाणून घेतला आणि म्हणाले, "नारदा, त्या संभ्रम बाळाला तो नारायण म्हणजे पक्का गुरु भेटला आहे. त्याने ब्रह्मलिखित खोटे पाडण्याची तो डाव रचला आहे; पण मीही माझा लेख खोटा पडू देणार नाही. तू हा चमत्कार पाहात राहा!"

मग तिसऱ्या दिवशी ब्रह्मदेवाने एका शेतकऱ्याचे रूप घेतले. बरोबर दहा चांगल्या गाई घेऊन तो त्या संभ्रमाच्या दारी गेला आणि म्हणाला, "बाळा, तुझ्या वडिलांनी ह्या दहा गाई माझ्याकडे ठेवल्या होत्या, त्या तू आता सांभाळ! ह्या दुभत्या गाई घे आणि तुझा उदरनिर्वाह चालव!"

तो प्रकार पाहून संभ्रमाला नवल वाटले. त्याने आपल्या गुरुकडे नारायणाकडे पाहिले आणि त्याची संमती घेऊन दहा गाई ठेवून घेतल्या. झाले! पुनः संभ्रमाचा तो ताकविक्रीचा धंदा जोरात चालला.

थोड्याच दिवसात नारायणाने पुनः विचार केला आणि संभ्रमाला त्या दहाही गाई दान देण्यास सांगितले. संभ्रमाने त्या बाबतीत पुनः आढेवेढे घेतले; पण नारायणाने त्याची समजूत घातली. तो म्हणाला, "अरे, या अधिमकमासात गोदानाचे फार मोठे पुण्य आहे! त्या पुण्याईने तुझे कल्याणच होईल. पुरुषोत्तमाला साऱ्यांची काळजी आहे! तू उद्याच हे दहा गाईचे दान करून टाक!"

गुरूची ती आज्ञा मानून संभ्रमाने त्या दहा गाई दुसऱ्या दिवशी यथाविधी दान देऊन टाकल्या व दक्षिणा म्हणून जवळचे सारे द्रव्यही देऊन टाकले. झाले! पुनः त्या दोघांना उपवास!

मग चित्रगुप्ताने ब्रह्मदेवाला तो प्रकार सांगितला. चित्रगुप्त म्हणाला, "ब्रह्मदेवा, तुमचे विधिलिखित खोटे ठरत आहे. त्या संभ्रम बाळाने दहा गाई दान देऊन टाकल्या. त्याचा ताकविक्रीचा धंदा बंद पडला. उदरनिर्वाह आता कशावर चालणार? गोदानाचे पुण्य त्याच्या जमा बाजूवर वाढले आहे!"

ब्रह्मदेवाने अंतर्ज्ञानाने सारा प्रकार जाणून घेतला. "संभ्रम



बाळाला नारायण पक्का गुरु भेटला. त्याने माझे लिखित खोटे पाडण्याचा हा डाव रचला आहे; पण मीही काही कमी नाही!" असे म्हणून ब्रह्मदेवाने काय केले—

दुसऱ्या दिवशी शंभर चांगल्या सवत्स धेनू घेऊन सावकाराच्या वेषात तो संभ्रमाच्या दारी आला म्हणाला, "बाळा, तुझ्या वडिलांनी माझ्याकडे ह्या गाई ठेविल्या होत्या. वाढत वाढत त्यांची संख्या शंभर झाली. आता माझ्याच्याने ह्या गाई सांभाळणे होत नाही म्हणून ही ठेव मी परत करीत आहे. तू ह्या शंभर गाई घे आणि गोरस विकून तुझा उदरनिर्वाह चालव."

संभ्रमाने आपल्या गुरूकडे पाहिले. त्याची संमती घेऊन त्याने त्या शंभर गाई ठेवून घेतल्या. झाले! त्याचा तो ताक विकून उदरनिर्वाहाचा धंदा अगदी जोरात चालला. विधिलिखित-सटवीची ती अक्षरे- खरी ठरविण्यासाठी स्वतः ब्रह्मदेवानेच हा सारा खटाटोप चालविला आहे, हे त्या नारायणाने मनोमन जाणून घेतले!

थोडे दिवस मजेत घालविल्यावर नारायणाने पुनः संभ्रमाला त्या शंभर गाईंचे दान करून पुण्य जोडण्याच्या उपदेश केला. संभ्रमानेही ती गुरुची आज्ञा पाळून लगेच दुसऱ्या दिवशी शतगोदानाचा सोहळा थाटाने पार पाडला. त्यावर दक्षिणा म्हणून जवळचे सारे साचलेले द्रव्यही दिले. आता पुनः त्या दोघांवर उपासमारीची पाळी आली.

नारायणाने गंगास्नान करून पुरुषोत्तमाची प्रार्थना केली. अधिकमासातील त्या संभ्रमाच्या गोदानाचे खूपच पुण्य झाले. पुरुषोत्तम प्रसन्न झाले. त्यांनी नारदाला पुनः प्रेरणा दिली. नारदाने ब्रह्मदेवाला पुनः सांगितले, "तात, तुमचे विधिलिखित खोटे ठरत

आहे. उदर निर्वाहासाठी त्या संभ्रम बाळाचा ताकविक्रीचा धंदा बंद पडला आहे!''

ब्रह्मदेवाला विचार पडला, ''तो मनाशी म्हणाला, की आता हजार गाई जरी मी नेऊन दिल्या तरी तो संभ्रम बाळ त्या गुरूच्या आज्ञेने गोदानाचे सहस्रपट पुण्य मिळविणारच.'' मग आता त्यापेक्षा... हं! असंच करावं झालं!''

तिसऱ्या दिवशी ब्रह्मदेवाने आपले हंस विमान सोडले. संभ्रम बाळ आणि गुरू नारायण स्नान करीत होते, तेथे ते विमान उतरले. ब्रह्मदेवाच्या दूतांनी संभ्रम बाळाला मोठ्या सन्मानाने त्या विमानात बसवून थेट ब्रह्मलोकात नेले, तेव्हा नारायणाला आनंद झाला. तो म्हणाला, ''छान झाले! या थोर अधिकमासात संभ्रमाला गोदानाच्या पुण्याईने मोक्षपद मिळाले!'' नारायण म्हणाले, ''लक्ष्मी, आता पुढे चोविसाव्या अध्यायात द्विजशर्माच्या कन्येची कथा सांगणार आहे, ती तू शांतपणे ऐक!''

●●●

## अध्याय चोविसावा : संभ्रमाच्या बहिणीची कथा

नारायण म्हणाले, ''लक्ष्मी, द्विजशर्माचा पुत्र संभ्रम हा अधिकमासातील गोदानपुण्याईमुळे मोक्षपदी गेला. ती कथा मागील अध्यायात तुला सांगितली. आता त्या संभ्रमाच्या बेपत्ता झालेल्या बहिणीची कहाणी मी तुला सांगतो. ऐक!''

संभ्रमाची ती छोटी बहीण नदीवर पाण्यासाठी गेली होती त्या वेळी तिला भुरळ घालून एका श्रीमंत वेश्येने परगावी नेले! आपली



बहीण बेपत्ता झाली ते पाहून संभ्रमाने खूप शोक केला. पुढे नारायणालाही ती गोष्ट कळली. त्याला खूप वाईट वाटले; पण त्याला तिचे ते विधिलिखित माहीत होते म्हणून तो गप्प राहिला.

संभ्रमाला गोदान-पुण्याईमुळे मोक्ष मिळाल्यावर नारायण एकटाच द्विजशर्माच्या घरी राहू लागला; पण तेथे त्याला चैन पडेना. संभ्रमाच्या त्या बेपत्ता बहिणीचा शोध घेऊन तिलाही मोक्षमार्गाला लाविले पाहिजे, असा विचार करून त्याने प्रवास सुरू केला.

नारायण निरनिराळ्या मोठ्या गावातून फिरला. तेथील श्रीमंत विलासी लोकांच्या अंगवस्त्रांची गुप्तपणे चौकशी करून तो बहिणीचा शोध करू लागला. जटाधारी नारायण साधू मोठमोठ्या नगरातील वेश्यांच्या माड्या चढून भविष्य सांगणाराचे सोंग करू लागला. त्यामुळे त्या धंद्यातील अनेक तरुणी आपले हात त्या ज्योतिषी नारायणाला दाखवू लागल्या. हात पाहताना तो त्या तरुणींना न्याहाळून आपल्या त्या बहिणीच्या रूपाचा वेध घेई. त्या तरुणीचे नाव, तिची पूर्वीची बाळपणाची थोडी हकीगत तो सहज विचारून घेई!

अशा प्रकारे नारायणाने अनेक नगरे धुंडाळली. शेवटी लक्ष्मण नावाच्या नगरीत त्याला त्या आपल्या संभ्रमाच्या बेपत्ता झालेल्या बहिणीचा शोध लागला.

एका नीटनेटक्या सुंदर इमारतीत माडीवरील सज्जात एक अत्यंत देखणी तरुणी उभी होती. जटाधारी नारायणाने तिच्याकडे रस्त्यातून न्याहाळून नीट पाहिले आणि तो धीटपणाने सरळ ती माडी चढून वर गेला.

त्या अवताराला पाहताच तरुणीला नवल वाटले! पण असो! आपल्याकडे अनेक श्रीमंत शेट-सावकार मोठ्या थाटाने येत

असतात. आज हा असा योग होत आहे तरी हरकत नाही. हाही धनवान असेल. रूपाचे घेणे काय! असे म्हणून तिने त्याचे लाडिकपणे स्वागत केले.

"यावे महाराज! या पलंगावर थोडा विसावा घ्या! हे गुलाबपाणी, हे केशरी दूध, ही मिठाई यांचा थोडा आस्वाद घ्या... तुमच्यासाठी फुलांची शेज तयार आहे. सुखशय्येवर मी दासी आपल्या सेवेला तयार आहे! हे माझे रूप, तारुण्य..."

ती तरुणी हे सारे पटापट बोलत असता तो जटाधारी नारायण तसाच स्तब्ध उभा राहून ते ऐकत राहिला. नंतर थोड्याच वेळात तो गंभीरपणे तिला म्हणाला, "हे संभ्रमाच्या बहिणी, द्विजशर्माच्या मुली, तू मला अजून ओळखलेले दिसत नाहीस. मी नारायण आहे! तुझा मानलेला भाऊ..."

ते शब्द ऐकताच ती तरुणी आश्चर्याने आनंदाने त्याच्याकडे निरखून पाहू लागली आणि ते ओळखीचे नारायणाचे शब्द, संभ्रम भावाचे आणि द्विजशर्मा पित्याचे नाव ऐकून एकदम तिने टाहो फोडला. नारायणाच्या गळ्यात पडून ती ढसाढसा रडू लागली.

मग नारायणाने तिला शांत केले. थोपटले आणि तो म्हणाला, "असू दे! विधिलिखित अटळ आहे! तुझी काहीच चूक नाही. तुझा शोध मला लागला, भेट झाली, छान झाले. आता यापुढे यातून आपण मार्ग काढू! या शरीरविक्रयाच्या धंद्यात तुला जे हे अपार धन मिळाले आहे हे सर्व आता दानधर्मात, पुण्यकार्यात खर्च केले पाहिजे. आता अधिकमास आहे. या महिन्यात मी सांगतो तशी व्रते, नियम, स्नान, दान तू जर केलेस तर मोक्ष मिळविशील!" नारायणाने सांगितले, तसे त्या तरुणीने करायचे ठरविले. दुसरे दिवशी भल्या पहाटे उठून ती गंगास्नान करून आली.



नोकरचाकरांना बोलावून त्यांच्या झाल्या कामाचा मोबदला पूर्णपणे देऊन टाकला आणि त्यांना यापुढे कामातून मोकळे केले. नंतर ब्राह्मणांना बोलावून गोदान, वस्त्रदान, पात्रदान, अन्नदान, दीपदान वगैरे दाने देऊन जवळची सर्व रक्कम दक्षिणा म्हणून दिली. सुवासिनींना हळदीकुंकू आणि दागिनेही वाटून टाकले. आता ती अगदी कफल्लक बनली.

तिच्या त्या पुण्यकृत्यांचे लोकांना खूप नवल वाटले. मात्र ज्याला जे मिळेल ते त्याने आनंदाने नको नको म्हणत घेतले. भांडीकुंडी, साऱ्या घरातील वस्तू तिने दान दिल्या. त्या दिवशी पूर्ण उपवास घडला. पाणी पिऊन ती झोपली.

झोपताना तिने नारायणाला विचारले, "आता पुढे उद्याचा विचार काय? जेवण्याशिवाय जगणार तरी कसे?" मग नारायण म्हणाला, "उद्या जो कोणी धनिक तुझ्याकडे येईल त्याला तीन हजार रुपये माग! ते तीन हजार जर मिळाले तरच त्याची इच्छा पूर्ण होईल असे त्याला सांग!"

दुसऱ्या दिवशी ती भल्या पहाटे उठली. गंगास्नान करून आली. दिवसभर आणि रात्री जे जे धनिक तिच्याकडे आले त्या प्रत्येकाला तिने तीन हजाराची अट घातली. मग काय! कोण देणार एकदम एवढी ही रक्कम! जो आला तो तसाच परत गेला. तिला काहीच मिळाले नाही म्हणून तिला त्या दिवसभर आणि रात्रभर उपवासच घडले!

नारायणाने तिच्या मुक्तीसाठी पुरुषोत्तम प्रभूची प्रार्थना केली. नारदमुनींनी ब्रह्मदेवाला विचारले, "तात, तुमचे विधिलिखित खोटे ठरणार आहे! ती संभ्रमाची बहीण आता शरीरविक्रय करून उदरभरण करीत नाही. तिने अधिकमास व्रत-नियम केले. आपली

संपत्तीही दान देऊन टाकली आणि आता तीन हजाराची तिची अट... आता पुढे तिचे काय होणार?''

ब्रह्मदेव म्हणाले, ''त्या तरुणीला तिचा मानलेला भाऊ नारायण हा गुरु लाभला आहे. त्याने तिचे विधिलिखित खोटे पाडण्याचा हा डाव रचलेला आहे; पण थांब जरा. मीही काही कमी नाही!''

दुसऱ्या दिवशी ब्रह्मदेवाने सौदागराचा वेष घेतला. तो सौदागर त्या तरुणीकडे आला. म्हणाला, ''हे घे तीन हजार! ही रक्कम ठेव. मी संध्याकाळी येईन! माझी इच्छा पूर्ण करीन!'' तिने ती रक्कम घेतली. संध्याकाळी त्याची वाट पाहिली; पण तो आलाच नाही. आता काय करणार!

मग त्याच रात्री दुसरा सौदागर तिच्याकडे आला. त्याने दहा हजाराची रक्कम तिच्यापुढे ठेवली आणि म्हणाला, ''माझी इच्छा...'' त्यावर ती चटकन म्हणाली, ''छे! छे! हे होणार नाही! ज्या गृहस्थाने मला तीन हजार दिलेले आहेत तो येऊन गेल्यावर नंतरच तुमचा विचार करीन!'' त्यावर तो म्हणाला, ''ठीक आहे. ही माझी रक्कम ठेवून घे. तो पहिला आज येऊन जाईल. मग मी उद्या रात्री येईन!'' त्या तरुणीजवळ ती रक्कम ठेवून तोही निघून गेला.

दुसऱ्या दिवशीही तो तीन हजार देऊन गेलेला पहिला सौदागर आलाच नाही. रात्रीही आला नाही आणि मग दुसरा तरी येऊन काय उपयोग! ती पाणी पिऊन झोपली!

सकाळी नारायणाने सांगितल्याप्रमाणे गंगास्नान करून तिने त्या सौदागरांचे ठेवलेले सारे धन दान देऊन टाकले आणि घरादारावर तुळशीपत्र ठेवून ती तरुणी नारायणासह गंगेच्या काठी झोपडी बांधून राहू लागली.



त्या अधिकमासात तिला गंगास्नान, उपवास आणि सर्वस्व दान यांचे महापुण्य घडले. त्यामुळे तिला स्वर्गातून विमान आले. देवदूतांनी तिला आणि नारायणाला सन्मानाने विमानातून थेट गोलोकात नेले. विष्णू म्हणाले, ''लक्ष्मी, अशी ही भावा-बहिणीच्या उद्धाराची मोक्षदायी कथा! आता पुढे पंचविसाव्या अध्यायात तुला अरुंधती आणि पार्वतीची कथा सांगणार आहे, ती ऐकावीस.''

●●●

## अध्याय पंचविसावा : पंचगौरी व्रतकथा

नारायण म्हणाले, ''लक्ष्मी, आता या अध्यायात अधिकमासातील एका वेगळ्या आणि आगळ्या व्रताची कथा मी तुला सांगत आहे. या व्रताचे नाव पंचगौरीव्रत! हे व्रत स्वतः पार्वतीने केले होते. ती कथा अशी:''

एके दिवशी वसिष्ठ मुनींची पत्नी अरुंधती कैलासावर शंकराच्या पार्वतीला सहज भेटायला गेली होती. अधिकमासातील पर्वकाळाचा दिवस होता तो. पार्वतीदेवी पूजा करीत होती. तो पूजेचा थाट आणि पार्वतीची ती निष्ठा पाहून अरुंधती म्हणाली, ''उमे, तू साक्षात आदिभवानी जगज्जननी असून ही आणखी कोणाची पूजा करतेस?''

पार्वती म्हणाली, ''ही पूजा आहे गौरीपंचकाची! हे गौरीपंचक माझ्या आईने आंदण म्हणून मला दिले आहे. या गौरीपंचकाची पूजा मी कुमारी होते तेव्हापासून करीत होते. म्हणजे त्याचे असे

झाले की...''

मी विवाहाला योग्य अशी उपवर वधू झाले होते. अशा वेळी एके दिवशी माझ्या माहेरघरी दुर्वास ऋषी आले होते. मी त्यांना नमस्कार केला तेव्हा ते म्हणाले, ''इच्छित वर प्राप्तिरस्तु!'' माझ्या आईने त्यांना विचारले, ''कोणते व्रत-पूजा हिने करावी म्हणजे त्यायोगे हिला उत्तम वर मिळेल?''

त्यावर दुर्वासांनी सांगितले ''हिने पंचगौरीव्रत करावे. गौरी पंचकाची पूजा करावी. विशेषतः अधिकमासात पंचपर्वांपैकी द्वादशीला हिने पंचगौरीव्रत करावे म्हणजे ते उत्तम फलदायी होईल!

व्रताच्या दिवशी भल्या पहाटे तीर्थस्थान करून पिंपळाच्या झाडाखाली गौरीपंचकाची स्थापना करावी. नंतर षोडशोपचारे पूजा करून ब्राह्मण सुवासिनींना भोजन द्यावे. यथाशक्ती दानवस्तू द्याव्या. नक्त-मौन भोजन करावे व व्रताचे आनंदाने उद्यापन करावे!''

पुढे लवकरच अधिकमास आला. दुर्वास मुनींनी सांगितल्याप्रमाणे मी यथाविधी निष्ठापूर्वक ते पंचगौरीव्रत केले आणि काय सांगू अरुंधती! उद्यापन आटोपून मी डोळे मिटून प्रार्थना केली तोच भगवान शंकर साक्षात् येऊन माझ्यापुढे उभे राहिले!

शंकर म्हणाले, ''पार्वती, मी तुला प्रसन्न झालो. तुझी काय इच्छा आहे ते सांग. ती मी पूर्ण करीन.'' मग मी म्हणाले, ''महाराज तुम्हीच माझे पती व्हावेत.'' ''ठीक आहे. तथास्तु!'' असे म्हणून त्यांनी मला मागणी घातली. माझ्या मातापित्यांनीही आनंदाने माझा विवाह शंकराशी करून दिला आणि विवाहात आईने मला ही गौरीपंचकाची मूर्ती आंदण दिली.

''अरुंधती, या पंचगौरीव्रताचे फळ मला असे माझ्या इच्छेप्रमाणे मिळाले. दुर्वासांनी सांगितलेले हे व्रत अधिकमासात केले ते विशेष फलदायी झाले! तेव्हापासून मी प्रत्येक अधिकमासात द्वादशीच्या पर्वकाळात हे व्रत नियमाने करीत असते! आता विवाहानंतरही या व्रताच्या पुण्याईमुळे माझ्या पतीचे माझ्यावर खूपच प्रेम आहे. सासर हे माझे माहेर बनले आहे. अधिकमासातील हे पंचगौरीव्रत असे प्रभावी आहे.'' मग अरुंधती म्हणाली, ''खरंच गडे पार्वती, हा तुझा पती – भोळाशंकर म्हणजे स्मशानी क्रीडा, चिताभस्म धारण करणारा, हाती नरकंकाल, व्याघ्रचर्मधारी असा विचित्र स्वतः असून भक्तांचे मात्र सतत शिव-कल्याण करणारा आहे. त्याला तू वश केलेस. तू सतत त्याच्या निकट असतेस म्हणजे त्याला तू इतकी प्रिय झालीस आणि तुलाही हे सासर म्हणजे माहेरच झाले आहे याचे कारण म्हणजे तू केलेले हे गौरीपंचकाचे व्रत! हे मला आज कळले. खरंच! हे पंचगौरीचे व्रत प्रत्येक स्त्रीने करावे असे मी म्हणते.''

नारायण म्हणाले, ''लक्ष्मी, अरुंधती आणि पार्वती यांचा असा सुखसंवाद झाल्यावर अरुंधती निघून गेली. आता पुढे सव्विसाव्या अध्यायात तुला आणखी अशीच अधिकमास माहात्म्याची कथा सांगेन ती तू ऐक!''

●●●

## अध्याय सव्विसावा : गुणवतीचे आगळे तेज

नारायण म्हणाले, ''लक्ष्मी, आता या अध्यायात अधिकमासातील व्रतांच्या पुण्याईमुळे माणसाला कसे नवे तेज प्राप्त होते याबद्दलची एक कथा सांगतो.

पूर्वी वीरबाहू नावाचा एक महान प्रतापी राजा होता. त्याची राणी यशोमती अतिशय सुंदर आणि राजाची खूपच आवडती होती. वीरबाहूच्या राज्यात सदैव सुख-शांती नांदत होती. राजाचा मंडण नावाचा प्रधान मोठा चतुर, गुणी आणि राज्यकारभारात सदैव तत्पर असा होता.

सारा कारभार मंडण प्रधानावर सोपवून वीरबाहू राजा अगदी निष्काळजीपणाने राहत होता. तो आपल्या सुंदर राणीच्या सहवासात नेहमी विलासात दंग असायचा.

पुढे एकदा अधिकमास आला. त्या वेळी मंडण प्रधानाची पत्नी गुणवती सहजच राणी यशोमतीच्या भेटीला आली होती. त्या दोघींच्या गप्पागोष्टी झाल्यानंतर गुणवती यशोमतीला म्हणाली, ''राणीसरकार आता अधिकमास आला आहे. या महिन्यात स्नान-दान-व्रत-नियम वगैरे पुण्यकर्मे केली पाहिजेत. आपण दोघीही ती व्रते करू म्हणजे आपल्या जीवनाचे सार्थक होईल!''

त्यावर राणी यशोमती मोठ्या ऐटीने तिला म्हणाली, ''अगं गुणवती, कशाचा तो अधिकमास आणि कसली ती त्यातली व्रते, दाने, आणि नियम! काय करायची ती पुण्यकर्मे, म्हणे जीवनाचे सार्थक होईल! बाई गं! हे आम्हांला एवढं राजवैभव मिळालेलं आहे. भरपूर संपत्ती आहे, दोन राजपुत्र आहेत. राजाचं माझ्यावर हे एवढं जिवापाड प्रेम आहे, कशाचं काय कमी आम्हांला? मग तू सांगतेस त्या अधिकमासातील व्रते-दाने-नियम करून जीवनाचे आणखी कोणते सार्थक करायचे आहे मला?''

''बाई गं, ती व्रते दाने पुण्यकर्मे कोणी करावीत; जे लोक दरिद्री आहेत, ज्यांना संपत्ती-सुख नाही, ज्या पतिपत्नींचं एकमेकांवर प्रेम नाही, जे लोक नेहमी दुःखी-कष्टी, असमाधानी



आहेत, त्यांनी आपल्या जीवनाचे सार्थक होण्यासाठी ती व्रते करावीत! तुला वाटलं तर तू ती व्रते-दाने-पुण्यकर्मे कर. मी कशाला उगीच ती व्रते-स्नाने-दाने-नियम करून शरीराला कष्ट देऊ?''

यशोमती राणीने ती अधिकमासातील व्रते-दाने यांची केलेली अवहेलना आणि दारिद्र्याने ती व्रते करावीत असा मारलेला टोमणा ऐकून गुणवती अस्वस्थ झाली. पुढे ती काहीच न बोलता तेथून निघून गेली.

गुणवतीने मात्र अधिकमासातील ती व्रते, दाने, नियम यथाशक्ती निष्ठापूर्वक पाळली, त्यामुळे तिला समाधानाचे एक आगळेच तेज प्राप्त झाले. तिचा चेहरा सदोदित तजेलदार, टवटवीत झाला. तिचे डोळे सदैव काजळ घातल्याप्रमाणे दिसू लागले. तिच्या कपाळावर हळदीकुंकू आणि भांगात गुलाल भरलेला सतत दिसू लागला. ती रात्रंदिवस आनंदी, तेजस्वी, समाधानी अशी दिसू लागली.

यशोमती राणीने मात्र अधिकमासातील एकही व्रत-दान-नियम काहीच केले नाही. ती सदैव विलासात लोळत राहिली. अधिकमास व्रते-दाने करणाऱ्या स्त्रियांची ती कुचेष्टा करू लागली. ती म्हणाली, ''बायांनो, लवकर मोक्षपदाला जा बरं! परलोकात त्या पुरुषोत्तमाने 'दिलेले सुख मला येऊन सांगा हो.''

अधिकमासव्रतांच्या केलेल्या त्या कुचेष्टांचा परिणाम म्हणा किंवा त्यापेक्षाही त्या तेराव्या विनासूर्यसंक्रांतीच्या महिन्यातील विशिष्ट वातावरणात आरोग्याचे नियम न पाळता केलेल्या अतिविलास कर्माच्या आरोग्यदृष्ट्या झालेल्या दुष्परिणामांमुळे म्हणा यशोमती राणीची प्रकृती एके दिवशी अचानक एकदम बिघडली. आणि तिला सपाटून ताप भरला.

राणी तापाने एकदम बेशुद्ध पडली. ती वार्ता कळताच राजवाड्यात खूपच धावपळ झाली. औषधोपचाराला काय कमी होते; परंतु काही केल्या राणीला आराम वाटेना. अखेर तीन दिवसांनी राणी शुद्धीवर आली. ती उठून बोलू लागली.

अशा वेळी प्रधानपत्नी गुणवती राजवाड्यात यशोमती राणीला भेटायला आली होती; पण गुणवतीला पाहताच यशोमती राणी एकदम खवळून उठली आणि संतापून ती गुणवतीला म्हणाली, "माझी ही दुखण्याची अवस्था पाहून सगळ्या मंडळींना काळजी लागली होती; पण तू मात्र दुष्टच आहेस. खुशाल डोळ्यात काजळ घालून, भांगी गुलाल भरून आणि तोंडात पानाचा विडा रंगवून ऐटीत मला भेटायला आलीस."

"तुझ्या तोंडावर चिंतेची काहीच छटा नाही. साजशृंगार करून, नट्टापट्टा करून तू मला भेटायला आलीस. निर्लज्ज स्त्रिये, मी राणी आहे. तू आमच्या सेवकाची सेविका आहेस. तुला काहीच दुःख वाटत नाही? जा येथून नीघ. मला यापुढे तुझे हे तोंड पाहावत नाही. चालती हो येथून!"

यशोमती राणीचे ते बोलणे ऐकून गुणवती थक्कच झाली. ती बिचारी निमूटपणे निघून गेली आणि घरी जाऊन रडत बसली.

मंडण प्रधानाने गुणावतीची खूप समजूत घातली. "राणीने दुखण्याच्या भरात तुला हाकून दिले. तिचे बोलणे मनावर घेऊ नकोस." हे पतीचे समजुतीचे बोलणे ऐकून गुणवती म्हणाली, "अहो पण मी काय मुद्दाम नट्टापट्टा करून गेले होते काय! माझे हे विड्याने रंगलेले तोंड, भांगी शेंदूर आणि हा माझा टवटवीत चेहरा, काजळ-कुंकू, हे आगळे तेज मला ह्या अधिकमासव्रताच्या पुण्याईने लाभले आहे, हे त्या राणीने ओळखले नाही. माझा अपमान



करून तिने मला हाकून दिले! याला काय म्हणावे?"

गुणवतीचे हे बोलणे चालू असतानाच तेथे राजाचे शिपाई आले आणि त्यांनी मंडण प्रधान आणि गुणवती यांना तुरुंगात पाठविण्याची राजाज्ञाच दाखविली. त्या राजाज्ञेपुढे कोणाचे काय चालणार? मंडण प्रधान आणि गुणवती यांनी गुपचूप, निमूटपणे ती आज्ञा पाळून तुरुंगवास पत्करला.

तुरुंगात असतानासुद्धा गुणवतीने आपले अधिकमास व्रतनियम चालूच ठेवले. उद्यापनही केले; त्यामुळे तिला आणखी आगळे तेज प्राप्त झाले होते. पुरुषोत्तमाच्या कृपेने तिकडे राजा वीरबाहू याला मात्र निरनिराळे दृष्टान्त होत होते.

वीरबाहू राजा अस्वस्थ झाला. त्याच्या मनात नेहमी येई, राणी यशोमतीच्या सांगण्यावरून आपण मंडण प्रधानाला आणि गुणावतीला कैदेत टाकले हा अन्यायच केला आहे! या विचाराने तो बैचेन होई. राणीच्या दुखण्याच्या वेळी गुणवती मुद्दाम नटापट्टा करून कशाला येईल?

मग वीरबाहू राजा मुद्दाम तुरुंगात जाऊन गुणवतीला पाहू लागला तर प्रत्येक वेळी तिच्या त्या चेहऱ्यावर आगळे तेज त्याला दिसून येई. ते तिचे काजळ घातल्यासारखे काळेभोर तेजस्वी डोळे, भांगी शेंदूर, विडा रंगवल्यासारखे सततचे लालचुटूक ओठ वगैरे...

मग एके दिवशी वीरबाहू राजा यशोमतीला एकान्तात म्हणाला, "तुझ्या सांगण्यावरून मी प्रधान मंडण आणि त्याची पत्नी गुणवती यांना तुरुंगात टाकले खरे; पण तुरुंगातसुद्धा ती गुणवती तिचे ते अधिकमासातील व्रते-नियम पाळीत आहे आणि त्या व्रतांच्या प्रभावाने तिचे ते आगळे तेज खुलत आहे!"

"काहीतरीच काय सांगता? म्हणे तिला ते आगळे तेज

अधिकामास व्रताच्या प्रभावाने लाभले आणि ते तेज आणखी खुलत आहे! अहोऽऽ ती गुणवती नाटकी आहे! मुद्दाम नटापट्टा करूनच ती मला हिणवीत असते! चला बरं आपण तुरुंगात जाऊन समक्षच तिच्या त्या प्रभावी आगळ्या तेजाचे तांबे-पितळ उघडे करू! चला!"

असे बोलून राणी यशोमती राजासह थेट तुरुंगात गेली. तेथे तिने गुणवतीला पाहिले तो काय! खरेच तिचे ते आगळे तेज खुललेले. मग यशोमतीने आपल्या दासींकडून गुणवतीचे ते तोंड स्वच्छ धुऊन घेतले. पुनः पुन्हा धुतले तरीही तिच्या डोळ्यात क़ाजळ, भांगी शेंदूर आणि ओठ पुनः लालचुटूक!

तो चमत्कार पाहून यशोमती राणीची खात्री झाली. अधिकमासव्रत पालनाचे महत्त्व तिला पटले. आपण त्या व्रताची कुचेष्टा केल्याचे फळही कसे आपणाला मिळाले हे तिच्या ध्यानी आले.

नंतर यशोमतीने गुणवतीची क्षमा मागून त्या उभयतांना तुरुंगातून सोडून त्यांचा सन्मान केला आणि पुढे यशोमती राणीही अधिकमासव्रते करू लागली.

नारायण म्हणाले, "लक्ष्मी आता पुढील सत्ताविसाव्या अध्यायात मी तुला ह्या यशोमती राणीप्रमाणेच एका अधमाला कशी उपरती झाली याची कथा सांगणार आहे. ती तू शांतपणे ऐक."

●●●



## अध्याय सत्ताविसावा : उपरती आणि मोक्षप्राप्ती

श्रीविष्णू म्हणाले, "लक्ष्मी, पूर्वी सुशर्मा नावाचा एक राजा आणि त्याची सुष्टुमती नावाची राणी उभयता आपला राज्यकारभार आणि संसार आनंदाने, मोठ्या धार्मिक निष्ठेने चालवीत होते. अधिकमासातील व्रते-नियम पाळून ते अपार दानधर्म करीत असत.

एके दिवशी त्या राजाकडे अंगिरा नावाचे एक तपोनिष्ठ ऋषी आले. राजाराणीने त्यांचे यथोचित स्वागत केले. त्यांची पूजाअर्चा केली. त्यामुळे अंगिरा ऋषींना खूपच आनंद वाटला. ऋषी म्हणाले, "राजा, तू मोठा भाग्यशाली आहेस. राणी सुष्टुमती पतिव्रता असून गुणसंपन्न आहे. तुम्ही अधिकमासाती व्रते-नियम-स्नानदानादि अनेक पुण्यकर्मे केली आहेत, त्यामुळे तुम्हांवर भगवान पुरुषोत्तम प्रसन्न आहेत. त्यांच्या कृपेने तुमचे इहपरलोकी परम कल्याणच होईल!"

त्यावर राजा म्हणाला, "मुनिवर्य, हे आमचे ठीक आहे; पण आमच्या नगरीत वीर नावाचा एक दुष्ट इसम आहे. तो चोऱ्या-मारामाऱ्या करतो, लोकांचे धन बळजबरीने लुटतो. चैनीत राहतो. तो दुराचारी आणि महापापी आहे.

त्या उर्मट, घमेंडखोर नीचाबद्दल अनेक तक्रारी माझ्याकडे आल्या. त्याला पकडण्यासाठी आम्ही राजदूत पाठविले; परंतु तो आपल्या पत्नीसह दूर अरण्यात कोठे तरी जाऊन लपून राहिला आहे. तेथे अरण्यातही त्याची हिंसाकर्मे चालूच आहेत. तो वाटमारी करतो. प्रवाशांचे खून करतो. त्याला पकडण्यासाठी आम्ही खूप प्रयत्न केले; परंतु तो हाती लागत नाही. आता यावर काय उपाय

करावा तेवढे कृपा करून मला सांगा. मार्गदर्शन करा!''

अंगिरा ऋषी म्हणाले, ''राजा, त्या दुराचारी वीराला पकडून तुरुंगात जन्मभर खितपत पडू देण्यापेक्षा त्याला आपल्या केलेल्या पापकर्मांचा पश्चात्ताप होईल आणि मग उपरती होऊन त्याच्या हातून काही पुण्यकर्मे घडतील. नंतर तो मोक्षपदाला जाईल अशी काही तरी व्यवस्था कर. अनायासे आता लवकरच अधिकमासही येत आहे. या अधिकमासात जर त्या वीराच्या आणि त्याच्या पत्नीच्या हातून काही पुण्यकर्मे घडली तर निश्चितच भगवान पुरुषोत्तमाच्या कृपेने त्याला उपरती होऊन मोक्षप्राप्ती होईल. त्याचे कल्याण होईल! पाहा!''

अंगिरा ऋषी गेल्यानंतर राजा सुशर्मा आणि राणी सुष्टमती या उभयतांनी मुनींच्या संदेशाप्रमाणे काही उपाय करण्याचा विचार केला. नंतर स्वतः राजाराणी एके दिवशी आपल्या निवडक लोकांसह त्या घोर अरण्यात गेले.

त्या अरण्यात एका तळ्याच्या काठावर एक छोटेसे सुंदर विष्णुमंदिर होते. त्या रम्य ठिकाणी राजाराणीने आपला तळ ठोकला. दोनचार दिवसांनंतर चमत्कार असा झाला, की त्या अधिकमासातील स्नानव्रतासाठी राजाराणी अगदी भल्यापहाटे अंधारातच त्या तलावात स्नानासाठी गेले होते. स्नान आटोपून ती राणी सुष्टमती एका वृक्षाआड कपडे बदलीत होती तोच एक स्त्री तेथे आली. तिने राणीचे पाय धरले आणि काकुळतीने ती म्हणाली, ''हे पुण्यशील राणी, माझे पती भारीच दुराचारी आहेत. अनेक पापे त्यांच्या हातून घडली आहेत. राजाकडून शिक्षा होईल म्हणून माझे पती या अरण्यात लपून राहिले आहेत. माझा पत्नीधर्म म्हणून मीही पतीबरोबर येथे लपून दिवस कंठीत आहे.'' नंतर



ती पुनः म्हणाली, ''राणीसाहेब, आता तुम्ही या तळ्याकाठी विष्णुमंदिराजवळ तळ ठोकूनच राहिला आहात, हे पाहून मला उपरती झाली. मी माझ्या पतीच्या अपराधाबद्दल क्षमा मागते. कृपा करून आम्हांला आता सन्मार्गाला लावा!''

त्या स्त्रीची ती विनवणी ऐकून राणीला दया आली. तिने त्या स्त्रीला राजापुढे नेले. त्या स्त्रीने राजाला नमस्कार करून आपली हकीगत सांगितली, तेव्हा राजा म्हणाला, ''बाई, तुझा तो पती वीर आता कोठे आहे. त्याला माझ्यासमोर आण. जर त्याला केलेल्या पापकर्मांचा खरोखर पश्चात्ताप झाला असेल तर आम्ही त्याला क्षमा करून सन्मार्गाला लावू!''

राजाचे हे बोलणे ऐकताच एका वृक्षाआड लपलेला तो वीर झटकन पुढे आला. त्याने राजाचे पाय धरले आणि तो मोठ्याने रडू लागला. रडत रडत तो म्हणाला, ''महाराज, मला क्षमा करा. मी पापी आहे. मी केलेल्या दुष्टकृत्यांचा मला पश्चात्ताप होत आहे!''

मग राजाराणीने त्या उभयता वीर आणि त्याची पत्नी यांना आपल्या बिऱ्हाडी नेले. तेथे अधिकमासानिमित्त भगवान पुरुषोत्तम राधाकृष्ण-मुरलीधर-गोपाळ यांची पूजा केली. त्या पूजेत त्या दोघांना समाविष्ट करून घेतले आणि अधिकमासातील व्रते-नियम समजावून सांगून त्या पुण्यकर्मांचे फळही सांगितले. त्यांना ती व्रते आचरण करायला लावली.

त्या व्रताच्या पुण्याईने अधिकमासाच्या शेवटी गोलोकातून एक विमान आले. त्या विमानातून देवदूतांनी तो वीर आणि त्याची पत्नी यांना सन्मानाने गोलोकात नेले.

विष्णु म्हणाले, ''लक्ष्मी, अधिकमासव्रताच्या पुण्याईमुळे त्या

पापी वीराला उपरती होऊन मोक्षप्राप्ती झाली. आता या कथेनंतर पुढील अठ्ठाविसाव्या अध्यायात एका थोर पतिव्रतेची कहाणी मी तुला सांगणार आहे!''

●●●

## अध्याय अठ्ठाविसावा : पतिव्रता भिल्लीण

लक्ष्मी म्हणाली, ''नारायणा, स्त्रियांनीच हे अधिकमासातील असो अथवा इतर कोणत्याही महिन्यातील असो सारे नेमधर्म-व्रते-नियम पाळावेत आणि पुरुषांनी मात्र त्याबाबतीत बंधने नसावीत असा हा भेदभाव शास्त्राने का बरे सांगितला आहे?''

तेव्हा नारायण हसून म्हणाले, ''देवी, तू म्हणतेस ते खरे आहे. या व्रतानियमांची बंधने पुरुषांना तितकी नाहीत! त्या बाबतीत स्त्रियांनाच सर्व बंधने पाळावी लागतात. त्यांच्याच हातून ती पाळली जातात. पुरुषांना घराबाहेरील कामांमुळे ती बंधने पाळणे तितकेसे शक्य होत नाही!''

स्त्री-देहाची आणि तिच्या मायाळू मनाची थोरवी फारच श्रेष्ठ आहे. स्त्री ही जगन्माता आहे. ती पतिव्रता असेल तर तिच्या पुण्याईमुळे महापापी पुरुषही पुण्यपदाला पोहोचतो. पतिव्रता स्त्रियांची थोरवी किती सांगावी! अनसूया आणि लोपामुद्रासारख्या अनेक पतिव्रता स्त्रियांच्या कथा तुला माहीतच आहेत; पण आता मी तुला या पृथ्वीवरील एका आगळ्या पतिव्रतेच्या पुण्याईची कथा सांगतो. पूर्वी काश्मीर देशात धर्मपुरीक्षेत्रात धर्मशर्मा या नावाचा एक गृहस्थ आपल्या सुशीला नावाच्या धर्मपत्नीसह राहात होता. त्या उभयतांनी अनेक धर्मकृत्ये केली; परंतु त्यांना मूलबाळ झाले नाही.



पुढे एकदा अधिकमास आला; त्या वेळी धर्मशर्मा म्हणाला, ''सुशीले, आपली अर्धी वये होऊन गेली. आता आपल्याला संतान होणे शक्य नाही. तरी आपण या अधिकमासात काशीला जाऊन गंगास्नान आणि काही व्रते-दाने करू! पुरुषोत्तमाच्या कृपेने आपल्याला मोक्षप्राप्ती तरी होईल!''

पतीची ती इच्छा मानून पतिव्रता सुशीला त्याच्याबरोबर काशीला गेली. तेथे अधिकमासातील नित्य गंगास्नान, नियम, यथाशक्ती व्रते आणि दाने यांनी निष्ठेने केली. थाटाने उद्यापनही केले.

त्या वातावरणातील बदलामुळे, व्रतनियम यांच्या समाधानामुळे आणि भगवान पुरुषोत्तमाच्या कृपेमुळे त्या पतिव्रता सुशीलेला आपल्या पतिसेवेचे फळ मिळाले. ती गर्भिणी झाली. पुढे यथाकाळ तिने दोन पुत्रांना जन्म दिला. त्यामुळे धर्मशर्माला खूपच आनंद झाला. साऱ्या लोकांनी त्या उभयतांचे भारी कौतुक केले.

शरद आणि शांताराम या जुळ्या बंधूंचे लालनपालन पिता धर्मशर्मा आणि माता सुशीला यांनी मोठ्या प्रेमाने केले. पाच वर्षे वयातील ते दोघे बंधू जणू बारा वर्षे वयाचे कुमार दिसू लागले. साऱ्या गावाची त्यांना दृष्ट लागली.

आणि एके दिवशी अचानक धर्मशर्माचे ते दोघे पुत्र भयंकर तापाने आजारी पडले. त्यांना नाना प्रकारचे औषधोपचार केले तरी त्यांचा तो ताप काही कमी होईना. राजाने राजवैद्य धन्वंतरी आणले; पण त्यांनीही त्या तापापुढे हात टेकले. त्यामुळे सर्वांनाच

खूप काळजी निर्माण झाली आणि खूप दुःखही वाटले; पण कोण काय करणार!

मग एके दिवशी गालव नावाचे ऋषी राजाकडे आले होते. राजाने त्यांना धर्मशर्माच्या त्या दोन पुत्रांच्या तापाची हकीगत सांगितली आणि त्यांचा तो ताप कशाने हटेल, त्या मुलांना आरोग्य कशामुळे लाभेल ते सांगावे, अशी विनंती केली.

गालव ऋषींनी अंतर्ज्ञानाने तो सर्व प्रकार जाणून घेतला आणि थोडा विचार करून ते म्हणाले —

" राजा, धर्मशर्माच्या नशिबी संतान नव्हते; परंतु अधिकमासात त्या उभयता पतिपत्नींनी गंगास्नान आणि व्रते-नियम केल्यामुळे त्यांना भगवान पुरुषोत्तमाच्या कृपेने हे दोन पुत्र लाभले. तथापि, धर्मशर्माच्या पूर्वीच्या पापांमुळे त्या पुत्रांना हा तापाचा भोग भोगावा लागत आहे!

तथापि, या तापावर औषधोपचारापेक्षाही एक दैवी उपाय केला तर त्यांचा ताप हटेल आणि ते दोन्ही पुत्र पुनः निरोगी होतील आणि सर्वांना सुख लाभेल!"

" तो दैवी उपाय कोणता ? " असे राजाने विचारल्यावर गालव ऋषी म्हणाले, " एखाद्या महान पतिव्रता पुण्यवान स्त्रीने त्या दोन्ही मुलांवर स्वहस्ते गंगाजलाचा शिडकावा तीन दिवस सतत त्रिकाळ करावा. त्यामुळे हा ताप हटेल आणि त्या मुलांना आरोग्य-सुख मिळेल! पाहा तो उपाय करा!"

मग राजाने राजधानीत दवंडी पिटवली, की एखाद्या महान पतिव्रता अशा पुण्यवान स्त्रीने धर्मशर्माच्या घरी येऊन त्यांच्या आजारी मुलांच्या अंगावर तीन दिवस त्रिकाळ गंगाजलाचा शिडकावा करावा! त्यामुळे त्या मुलांचा ताप हटणार आहे होऽ"



तो डांगोरा ऐकून साऱ्या स्त्रियांची मोठीच गडबड उडाली! स्वतःला पतिव्रता म्हणून गावात ऐटीने सांगणाऱ्या स्त्रियासुद्धा काळजीत पडल्या. त्या मनाशी विचार करू लागल्या, की आपण थोर पतिव्रता आहोत, हे जरी खरे असले तरी जर का आपल्या हातून त्या गंगाजळाच्या शिडकाव्याने त्या मुलांचा ताप उतरला नाही. तर! तर मग काय आपण पतिव्रता नाहीत हेच त्यामुळे सिद्ध होणार आणि मग आपली छी-थू होणार! छे! छे! नकोच ते तेथे जाणे! उगाच हात दाखवून अवलक्षण कशाला करायचे? हा असा परोपकार कशाला करायचा?"

झाले! मग काय! त्या आजारी मुलांच्या अंगावर गंगाजलाचा शिडकावा करण्यासाठी कोणीही स्त्री पुढे येईना! त्या गोष्टीचे राजाला मोठेच नवल वाटले! आपल्या राज्यात कोणीच पतिव्रता स्त्री नाही, की काय याची शंका त्या राजाला आली. त्याने स्वतःच्या राण्यांनासुद्धा गंगाजल त्या मुलाच्या अंगावर शिंपडायला सांगितले; पण छे! एकही राणी पुढे होईना. हरे राम! मग राजा अंतरी खूपच चकित झाला.

नंतर एकदा ऐन दुपारच्या वेळी एक भिल्लीण तहान लागली म्हणून धर्मशर्माच्या वाड्यात पाणी पिण्यासाठी गेली, तेव्हा तिने त्या ठिकाणी ती दोन आजारी मुले पाहिली. त्या आजाऱ्याजवळ उशा-पायथ्याशी काही पुरुष मंडळी बसलेली त्या भिल्लिणीने पाहिली. मग तिने थोडी चौकशी केली तेव्हा तिला कळले, की धर्मशर्माच्या या दोन्ही मुलांना सपाटून ताप भरलेला आहे.. अनेक औषधोपचार केले; परंतु आराम नाही. आता एखाद्या पतिव्रता स्त्रीने जर या मुलांवर गंगाजलाचा शिडकावा केला तरच या मुलांचा ताप उतरेल आणि यांना आराम पडेल. जाणत्याने हा सल्ला दिला

आहे; परंतु अजूनही कोणीच खरी पतिव्रता स्त्री या कामासाठी पुढे आलेली नाही! काय करावे?

तो प्रकार ऐकून त्या भिल्लिणीला थोडे नवल वाटले; पण ती रागाने म्हणाली, "काय बया ह्या बाया! कोणालाच कशी दयामाया नाही! साधा उपाय हा! मग कोणीच कशी हे काम करीत नाही? पतिव्रता म्हणजे काय, मला तर काहीच त्या पतिव्रताचा धर्म कळत नाही; पण आता मीच ते गंगाजल त्या पोरांवर शिंपडते! आणा द्या माझ्याजवळ ते गंगाजल!"

तेव्हा लोक तिला म्हणाले, "तुझ्या हाती गंगाजल देतो; पण तू पतिव्रता आहेस का याचा आधी नीट विचार कर. या मुलांचा ताप जर तुझ्या हातून उतरला नाही तर---"

"ते मला काइबी इच्यारू नगा! शंका कशाला घेता? अवो म्या जर माझ्या पतिपरता दुसऱ्या कोनाचा सपनात बी इच्चार केलेला न्हाई! अन् जी पतिपरता कदीच न्हाइली नाई! मग तुम्ही मला पतिवरता म्हना नायतर कायबी म्हना! चला आना ते गंगाजल! या बाळांचा ताप उतरेल! आराम पडेल या पोरांना!"

त्या भिल्लिणीचे ते पातिव्रत्याचे आगळे आत्मविश्वासाचे बोलणे ऐकून सारे लोक थक्क झाले. मग त्या भिल्लिणीने हाती गंगाजल घेऊन आणि आपल्या पतीचे नाव भगवंता – असे घेऊन झटकन ते गंगाजल त्या बाळांवर शिंपडले; तर काय नवल! त्या बाळांचा ताप तत्काळ उतरला. ते दोघे बंधू उठले आणि त्यांनी त्या भिल्लिणीचे पाय धरले. त्या भिल्लिणीनेही त्या बाळांना प्रेमाने थोपटून त्यांचे मुके घेतले. नंतर राजाने आणि लोकांनीही त्या थोर पतिव्रता भिल्लिणीचा मोठा सन्मान केला.

भगवान विष्णू म्हणाले, "लक्ष्मी, ऐकलीस ना स्त्री-पातिव्रत्यधर्माची ही आगळी कथा! हे आहे स्त्रियांचे विशेष महत्त्व! आता पुढे एकोणतिसाव्या अध्यायातील उद्यापन-विधी मी तुला सांगणार आहे तो लक्ष देऊन ऐक!"



●●●

## अध्याय एकोणतिसावा : उद्यापनाचा विधी

नारायण म्हणाले, "लक्ष्मी, आतापर्यंत तुला मी अधिकमासाचे महत्त्व, त्या महिन्यात करण्याची सर्व धर्मकृत्ये, पुण्यपावन अशी व्रते, मोक्षदायी दान आणि त्या मलमासात पाळावयाचे नियम हे सारे सांगितले आहे. तसेच, या महिन्यातील पुण्यकर्मे करणाऱ्यांच्या काही कथाही सांगितल्या आहेत."

आता या अध्यायात अधिमकमासाव्रताची सांगता म्हणजेच उद्यापन कसे करावे याची माहिती सांगतो. कारण ज्यांनी या महिनाभर सतत यथाशक्ती स्नान-दानादि व्रते-नियम केले किंवा कोणी पाचसात दिवस अथवा एक दिवस जरी केले तरी त्याचे उद्यापन केलेच पाहिजे. उद्यापनाशिवाय त्या व्रताच्या दानाचे पुण्यफळ मिळत नाही.

या उद्यापनाचा विधी थोडक्यात सांगतो. अधिकमासात आपण यथाशक्ती कितीही दिवस स्नानदानादि व्रत पूर्ण केल्यानंतरच्या दुसऱ्या दिवशी त्या व्रताचे उद्यापन करावे. उद्यापनाच्या दिवशी पहाटेच लवकर उठून शक्यतो थंड पाण्याने स्नान करावे. नित्यनियमाची देवपूजा, पाठ-पाठांतर करून झाल्यावर घरातील पवित्र जागेवर पाट किंवा चौरंग मांडावा.

केळी अथवा कर्दळी यांचे खुंट चौरंगाभोवती लावून शोभा करावी. त्या पाट – चौरंगावर गव्हातांदळाची रास ठेवून तीवर कलश मांडावा. त्या कलशावर भगवान पुरुषोत्तम-राधाकृष्ण मुरलीधराची मूर्ती ठेवावी.

गणेशासह पुरुषोत्तमाची षोडशोपचारे पूजा करून पक्वान्नाचा नैवेद्य दाखवावा. नंतर अधिकमासाची, पुरुषोत्तमाची आरती करावी.

या उद्यापनाच्या दिवशी आप्तेष्टांना, ब्राह्मण सुवासिनींना मिष्टान्न भोजन द्यावे. विडादक्षिणा आणि ब्राह्मणांना यथाशक्ती वस्त्र, पात्र, दीपदान, तीस तीन अनारसे किंवा बत्तासे, खारका, सुपाऱ्या, फळे वगैरे वस्तू दान द्याव्यात.

सुवासिनींना फणी-करंडा, गरसोळी, आरसा वगैरे सौभाग्यवायने द्यावीत आणि भगवान पुरुषोत्तमापुढे गायन, भजन, सत्यनारायण पूजाप्रसादही करावा. दुसऱ्या दिवशी ती पूजा विसर्जन करून प्रार्थना करावी. म्हणजे उद्यापन पूर्ण होते. व्रताची सांगता होते.

उद्यापनाच्या दिवशी ' अधिकमास माहात्म्य ' ही पोथी वाचावी आणि शक्य तेवढ्या त्या पोथीच्या प्रती, निदान पाच तरी प्रती ब्राह्मण सुवासिनींना दान द्याव्यात. त्यायोगे फार पुण्य मिळते. तेहतीस प्रती जर दान दिल्या तर त्यांचे महत्त्व विशेष आहे.

तसेच, स्नानव्रत केलेल्यांनी उद्यापनाच्या दिवशी गंगापूजन करून गंगेचे पाणी पात्रासह दान करावे. नक्तभोजन व्रत केलेल्यांनी ब्राह्मणाला भोजन द्यावे. मौनभोजन व्रत केलेल्यांनी एखाद्या मंदिरात घंटा बांधावी. तूप घालून धातूचा दिवा दान द्यावा.

अशा प्रकारे या अधिकमासातील पुण्यकर्मे केल्यामुळे स्त्रियांना



सौभाग्य प्राप्त होते. संतती, संपत्ती, सुख आणि समाधान मिळते. दरिद्र्याला धन मिळते. सर्वांना आयुरारोग्य लाभते. व्यापार-धंदा, नोकरी यात प्रगती होते. बरकत येते. मनातील सदिच्छा पूर्ण होते आणि शेवटी उद्यापन केल्यामुळे या सर्वांचे उत्तम फळ मिळते. असा हा उद्यापनविधी आणि त्याचे हे महत्त्व आहे!

भगवान विष्णू म्हणाले, " लक्ष्मी, अधिकमासात तीस दिवस रोज एकप्रमाणे ह्या कथांचा एक अध्याय तरी वाचावा. पुढे एकतिसावा अध्याय. तो वाचनाला महत्त्वाचा आहे. कारण त्यात या पोथीतील कथांचा सारांश मी तुला सांगेन. तो अवश्य मन लावून ऐकलाच पाहिजे. "

●●●

## अध्याय तिसावा : द्रौपदीच्या पूर्वजन्माची कथा

अधिकमास हा तीन वर्षांनी एकदा येतो. त्या वर्षात हा तेरावा महिना धोंडा म्हणून मानला जातो. या मलमासात मंगलकार्ये वर्ज्य असून पुण्यकृत्ये करावीत. या महिन्यात स्नान, दान, उपवास वगैरे व्रते केल्याने मोक्ष मिळतो असे सांगितले आहे.

या अधिकमासाला तुच्छ मानले आणि पुरुषोत्तम भगवान यांचा अवमान केला तर त्या माणसाला कसे दुःख प्राप्त होते या संबंधी द्रौपदीच्या त्या पूर्वजन्मातील अपराधाची कथा स्वतः भगवान श्रीकृष्णाने पांडवांना सांगितली, ती कथा या अध्यायात दिली आहे. श्रोत्यांनी सावधान होऊन ती ऐकावी.

काम्यक नावाच्या वनात पांडव राहात होते. एके दिवशी

द्वारकाधीश श्रीकृष्ण त्यांच्या भेटीला आले. पांडवांनी आनंदाने त्यांचे स्वागत केले. राजपद सोडून पांडवांना वनवास भोगावा लागला. त्यांची ती दशा पाहून श्रीकृष्ण उदास झाले.

धर्मराज म्हणाले, "कृष्णा, आज तू आमच्या भेटीला इथे आलास! आम्हां सर्वांना आनंद झाला."

"पण काय रे कृष्णा, आमची ही वनवासातील दुःखं तुला पाहवतात का?" अर्जुनाने असा प्रश्न केला.

त्यावर श्रीकृष्ण थोडे हसले आणि म्हणाले, "अरे, तुमचं कर्म तुम्हांला भोवले! मी काय करणार! धर्मराजाचा तो द्यूत खेळण्याचा छंद ऽ आणि ऽऽ"

"आणि काय? कृष्णा, स्पष्ट आणि खरे सांग! आमचे आणखी कोणते कर्म आम्हांला भोवले?" धर्मराजाने असे विचारल्यावर श्रीकृष्ण गंभीर होऊन म्हणाले, "या द्रौपदीचा– तुमच्या पत्नीचा– तो पूर्वजन्मीचा अपराधही तुम्हांला भोवला बरं ऽ"

"द्रौपदीचा पूर्वजन्मीचा अपराध? कोणता? ती कहाणी आम्हांला कळलीच पाहिजे! सांग बरे." अर्जुन उतावळेपणाने म्हणाला. मग कृष्ण म्हणाला, "सांगतो. शांतपणे बसून ऐका ती तिची कर्मकथा!"

पूर्वी मेधावी नावाचा एक ऋषी होता. नदीतीरावरील आश्रमात त्याने आपला संसार थाटला होता. त्याच्या घरी एक कन्या जन्मली, तिचे नाव मेधावती.

मेधावतीच्या बाळपणातच तिची आई वारली. मग पित्यानेच त्या मुलीचे लालनपालन केले. तिला वाढविली. विद्या-शास्त्रे शिकवली. मोठी गोड मुलगी होती ती मेधावती. मेधावती मोठी



झाली. लग्नाला योग्य झाली. मेधावी ऋषींनी तिच्यासाठी खूप-स्थळे पाहिली; पण तिला योग्य असा वर मिळेना. पित्याला काळजी वाटू लागली. तो खूप फिरला; पण छे!

फिरता फिरता एके दिवशी मेधावी ऋषीला सपाटून ताप भरला. तो घरी आला आणि दारातच मूर्च्छित होऊन पडला. मेधावती घाबरून गेली. लोकांनी त्याला मग शुद्धीवर आणले.

मेधावीचा ताप उतरेना. तो आजारी पडला. मेधावतीने त्याची खूप सेवा केली; पण छे! नंतर एके दिवशी मेधावी ऋषी मरण पावला. मेधावतीने खूप शोक केला. लोकांनी तिचे सांत्वन केले. तिला धीर दिला.

आई गेली. वडील गेले. मेधावती अनाथ झाली. उदास होऊन ती सारखा विचार करीत होती. आता पुढे आपले कसे होणार!

मेधावती अरण्यात गेली. तपाचरण करू लागली. शंकराची आराधना करू लागली. ती अन्न घेईना. तिचे शरीर सुकून गेले. ती कृश झाली. "देवा महादेवा, आता मला तुमचा आधार आहे. माझे लग्न व्हावे. मी सुखाने संसार करावा, हीच माझी इच्छा आहे. ती तू पूर्ण कर!" अशी तिने प्रार्थना केली.

मेधावती तपाचरण करीत असताना एके दिवशी चमत्कार झाला. "मुली, डोळे उघड! मी दुर्वास मुनी. तुझ्या पित्याचा मित्र. मला ती वार्ता कळली. मेधावी इहलोक सोडून गेला! मला खूप दुःख झाले. आमची संगत सुटली. व्हायचे ते झाले; पण तू धीर धर! तू अनाथ नाहीस. मी तुला पित्यासमान आहे! ऊठ बाळे, हे तपाचरणाचे कष्ट पुरे झाले. आता विवाह करून सुखाने संसार करून जन्माचे सार्थक कर."

मेधावती म्हणाली, "ठीक आहे. तात, मी त्यासाठीच हे

तपाचरण करीत आहे. आता भगवान शंकर प्रसन्न होतील. मला ते इच्छा पूर्ण होण्याचा वर देतील. त्यांची आराधना... ''

''पण मुली, मी सांगतो तसे कर. हे बघ आता अधिकमास येईल. त्यातील स्नान-दान व्रताचे आचरण कर. त्यायोगे भगवान श्रीपुरुषोत्तम प्रसन्न होतील. तुझी इच्छा पूर्ण करतील.'' दुर्वास ऋषी सांगत होते---

पण मध्येच मेधावती म्हणाली, ''तात, मी जे शंकराचे तप करीत आहे ते असे मध्येच सोडून अधिकमास व्रत आणि त्या पुरुषोत्तमाची आराधना कशी करू? शिवाय भगवान शंकर हे महादेव आहेत. ते शिव म्हणजे कल्याण करणारे. मी त्यांची आराधना करते. ही निष्ठा सोडून मी त्या पुरुषोत्तमाचे व्रत करणार नाही.''

मेधावतीच्या त्या बोलण्याचा दुर्वासांना राग आला. ते संतापले होते, तरीही राग आवरून ते समजुतीच्या स्वरात तिला म्हणाले, ''बाळे, मी जे सांगतो ते तुझ्या हिताचेच आहे. माझा शब्द मोडू नकोस. शिवशंकर हे कल्याण करणारे असले तरी तो भगवान पुरुषोत्तम आणि त्याचे ते अधिकमासव्रत पुण्यप्रद मोक्ष देणारे आहे! तू ते व्रत कर!''

''पण तात, महादेव हे महान देवच आहेत ना? त्या पुरुषोत्तमापेक्षा....''

मेधावतीचे ते बोलणे मध्येच तोडून दुर्वास मुनी पुन: रागाने म्हणाले, ''हे बघ, पुरुषोत्तमाला आणि अधिकमासव्रताला तू तुच्छ लेखू नकोस! माझाही अपमान करू नकोस. तुझा हट्टच तसा आहे तर... या अपराधांचा परिणाम तुला पुढील जन्मी भोगावा लागेल''



पुढील जन्मी तू राजाची राणी झालीस तरी तुला आणि तुझ्या पतीलाही मग वनवासाचे दु:ख भोगावे लागेल. नंतर पुन: अधिकमासव्रताच्या पुण्याईने आणि भगवान पुरुषोत्तमाच्या कृपेने तुम्हांला तुमचे पूर्ववैभव प्राप्त होईल. हे माझे शब्द खोटे ठरणार नाहीत!''

इतके बोलून ते कोपिष्ट दुर्वास ऋषी तेथून तणतणतच निघून गेले. मेधावतीला खूप वाईट वाटले; पण काय करणार! तिने मग अत्यंत कडक उपवास करून अग्निकाष्ठ भक्षून महादेवांची आराधना चालू केली. त्या खडतर तपश्चर्येचे फळ तिला लवकरच मिळाले.

एके दिवशी अकस्मात भोलेनाथ शंकर प्रगट झाले. घनगंभीर आवाजात ते म्हणाले, ''बाळे, मी प्रसन्न झालो आहे. मागशील तो वर देतो.''

मेधावतीची ती मागणी ऐकून भोलेनाथ हसून म्हणाले, ''मुली, मी तुला तसाच वर देतो. तू पाच वेळा पती मागितलास म्हणून पुढील जन्मी तू पाच पतींची पत्नी होशील. तुझ्या दैवी जे आहे तेच घडून येईल आणि हो! आणखीही ऐकून घे.'' तू अधिकमासव्रताला आणि पुरुषोत्तमाला तुच्छा मानलेस. दुर्वास ऋषींच्या अवमान केलास, त्या अपराधाचेही फळ तुला भोगावे लागेलच! तू पुढील जन्मी पाच पतींची राणी होशील आणि राणीपद मिळूनसुद्धा त्या पतींसह तुला वनवासाचे दु:ख भोगावे लागेल!''

इतके सांगून तो पंचानन श्रीशंकर गुप्त झाला. मेधावती तर सुन्नच झाली. हाय रे दैवा! काय झाले हे! मी सहज बोलून गेले त्याचा परिणाम हा असा विपरीतच झाला! पुढील जन्मी पाच पतींची मी राणी होणार आणि मला त्या पतींसह वनवासाचे दु:ख भोगावे लागणार! हाय!

या विचारांनी ती गुंग झाली. तिला रात्रंदिवस चैन पडेना. चिंतेने ती जळत राहिली. पाच पती आणि वनवास! काय ती विचित्र दैवगती! सततच्या त्या धसक्याने ती हळूहळू क्षीण झाली आणि शेवटी तिचा आत्मा कुडीतून निघून गेला. ती मरण पावली आणि मग पुढील जन्मी तिचा तो आत्मा द्रुपद राजाच्या यज्ञकुंडातून बालिकारूपाने प्रगट झाला.

पांचाळ देशाचा द्रुपद राजा. त्याने एकदा महायज्ञ केला. त्या यज्ञकुंडातून अचानक एक बालिका प्रगट झाली. तिचे नाव याज्ञसेनी असे ठेवले. द्रुपदराजाची ती कन्या द्रौपदी.

द्रौपदीच्या स्वयंवरात अर्जुनाने पण जिंकला. द्रौपदीने त्याला वरमाला घातली. घर आल्यावर कुंतीच्या आज्ञेने ती द्रौपदी पाच पांडवांची पत्नी बनली. तिची अशी वाटणी झाली. श्रीशंकराचे वरदान सत्य झाले.

पुढे पांडवांना राज्य सोडून वनवासात जावे लागले. पतीबरोबर द्रौपदीलाही तो वनवास भोगणे प्राप्त झाले. दुर्वास ऋषींचा शाप खरा ठरला.

अधिकमासव्रताची आणि पुरुषोत्तमाची पूर्वजन्मी अवहेलना केली त्या मेधावतीला म्हणजेच या जन्मीच्या ह्या द्रौपदीला त्या घोर अपराधाचे फळ हे असे भोगावे लागत आहे.

श्रीकृष्णाने द्रौपदीच्या पूर्वजन्मीच्या अपराधाची अशी कहाणी सांगितल्यानंतर द्रौपदीसह पाचही पांडव थक्कच झाले. मग त्या योगेश्वराला वंदन करून धर्मराज म्हणाले, "कृष्णा, झाले ते गेले. आता तरी पुढे आम्ही काय करावे म्हणजे या दुःखातून आमची सुटका होईल, तो उपाय सांग!"

श्रीकृष्ण म्हणाले, "आता उपाय हाच, तुम्ही सर्वांनी येत्या



अधिकमासात पूर्णपणे स्नान-दान-उपवासादी व्रते निष्ठापूर्वक करावी, त्यामुळे भगवान पुरुषोत्तम प्रसन्न होतील. त्यांच्या कृपेने तुमची वनवासातील दुःखे दूर होतील आणि तुमचे पूर्ववैभव तुम्हांला प्राप्त होईल."

पुढे लवकरच अधिकमास आला. द्रौपदीसह पांडवांनी त्या महिनाभर योग्य ती सारी व्रते निष्ठापूर्वक केली. यथाशक्ती दानेही दिली. शेवटी उद्यापनाचा तर खूपच थाट केला.

त्या पुण्यकर्मांच्या प्रभावाने त्या सर्वांवर भगवान पुरुषोत्तम प्रसन्न झाले. त्यांच्या कृपेने भारतीय युद्धात पांडवांना विजय मिळाला आणि त्यांना पुनः राजपद प्राप्त झाले.

●●●

## अध्याय एकतिसावा : सर्व कथांचे सार

भगवान विष्णू म्हणाले, "लक्ष्मी, आतापर्यंतच्या तीस अध्यायात मी तुला 'अधिकमास माहात्म्य' आणि भगवान पुरुषोत्तमाच्या कृपेच्या थोर कथांचा महिमा सांगितला. आता हा एकतिसावा अध्याय म्हणजे एकतीस पुष्पांची माळच जणू गुंफलेली आहे. एकतीस वार्तांचा हा एक दिवाच प्रकाशित केलेला आहे. ही माला आणि हा दीप भगवान गोपाल, राधाकृष्ण-मुरलीधर यांना अर्पण केले आहेत."

'अधिकमास माहात्म्य' कथांचे सार असलेला हा एकतिसावा एक जरी अध्याय वाचला किंवा ऐकला तरी संपूर्ण माहात्म्य श्रवणाचे पुण्यफळ मिळते. तर आता या कथासार पोथीचे

अध्यायवार क्रमाने सार सांगतो, ते लक्ष देऊन ऐक!

तपोवनातील ऋषींच्या मेळाव्यात बसून सूत नावाच्या पुराणिकाने 'अधिकमास माहात्म्य' सांगितले, त्या कथांचा लक्ष्मीनारायण संवादाच पहिला अध्याय म्हणजे या अधिकमासाची उत्पत्ती कशी झाली आणि या मलमासाला थोर पुरुषोत्तमाचे नाव कसे मिळाले याची कथा आहे.

दुसऱ्या आणि तिसऱ्या अध्यायात मिळून गोसेवा आणि गाईचे महत्त्व तसेच, पौलव्य ऋषींची कथा सांगितली आहे. चौथ्या अध्यायात ब्राह्मणसेवा आणि पाचव्यात नृगराजाची कथा दिलेली आहे.

सहाव्या अध्यायात दीपपूजेचे महत्त्व आणि मांजरीचा उद्धार तसेच, सातव्यात शांकलीच्या दोन बायकांची सवतीमत्सराची कथा आणि दीपदान-व्रतसाधनेचे फळ कोणाला कसे मिळते याचे वर्णन आहे.

आठव्या अध्यायातील कथा म्हणजे एका चिकू माणसाच्या बायकोने त्याला पाण्याऐवजी दूध दिले. ते प्रवासात त्याने वारुळात ओतले, त्यामुळे शेष प्रसन्न झाला आणि त्याने त्या इसमाला अमाप धन देऊन श्रीमंत व सुखी केले.

नवव्या अध्यायात माहिष्मती नगरातील एका स्त्रीने आपले अधिकमासातील सात दिवसांच्या स्नानाचे पुण्य एका म्हातारीला देऊन तिचा उद्धार केला ही कथा दिलेली आहे. दहाव्यात मौन भोजन व्रताची अवंती नगरातील एका गरीब गृहस्थाची कथा सांगितली आहे.

अकराव्या अध्यायात अधिकमासातील पंचपर्वांपैकी व्यतिपात, वैधृती आणि अमावास्या तसेच, बाराव्यात द्वादशी आणि पौर्णिमा पर्वाचे महत्त्व सांगून त्याच्या कथा दिलेल्या आहेत.



तेराव्या अध्यायात त्रिरात्रव्रत, दशमी-एकादशीसह द्वादशी या तिन्हीचे मिळून महत्त्व दिलेले असून चौदाव्यात त्या संबंधी द्वादशीचे साधनव्रत तसेच, दुर्वासमुनी आणि अंबरीषराजा यांची कथा आहे.

पंधराव्या अध्यायात श्रीरामाच्या साधनद्वादशीच्या पारण्याच्या वेळी शतमुखी रावणाचा सीतेने केलेला वध ही आगळीच कथा दिलेली आहे.

स्मितविलासिनी अप्सरेच्या उद्धाराची कथा सोळाव्या अध्यायात, तर सतराव्यात धर्मशर्माने पिशाच्चाचा उद्धार केला, ती कथा आहे. अठराव्यात काशीतील मंगळागौरीची कथा आणि एकोणिसाव्यात विप्रशर्माने राक्षसाचा उद्धार केल्याची कथा सांगितली आहे. विसाव्या अध्यायात सौराष्ट्र देशातील सोमशर्मा गृहस्थाने आपले त्रिरात्र पुण्य देऊन राक्षसाचा उद्धार केला, ती कथा आहे.

एकविसाव्या अध्यायात विराट देशातील माहूरगड येथील एका गृहस्थाने गंगास्नान अधिकमासात केले, तेव्हा त्याचा कुष्ठरोग दूर झाला, ती कथा सांगितली आहे. माहिष्मती नगरीत एका गृहस्थांच्या घरी नारायण नावाचा एक सदाचारी मुलगा आला. तेव्हापासून त्या गृहस्थांचा ताकविक्रीचा धंदा करणारा मुलगा आणि शरीरविक्रय करणे भाग पडलेली त्या मुलाची बहीण या बहीणभावांचा उद्धार नारायणाने कसा केला त्या कथा बावीस, तेवीस आणि चोवीस या तीन अध्यायात मिळून दिलेल्या आहेत.

पंचविसाव्यात अरूंधती-पार्वती संवाद, सव्विसाव्यात मंडण प्रधानाची पत्नी गुणवती हिच्या आगळ्या तेजाची कथा सांगितली आहे. सत्तविसाव्या अध्यायात साधारण एक दिवस जरी

अधिकमास व्रत केले तरी माणसाला मोक्ष मिळतो ही कथा आणि अठ्ठाविसाव्यात काश्मीर देशीच्या भिल्लीण पतिव्रतेची आगळी कथा दिलेली आहे.

एकोणतिसाव्या अध्यायात अधिकमासव्रत-उद्यापनाचा विधी सविस्तर सांगितला. तिसाव्या अध्यायात द्रौपदीने आधीच्या जन्मात केलेल्या अपराधामुळे द्रौपदीच्या पुढील जन्मात तिला कसा त्रास सोसावा लागला आणि तो भगवान पुरुषोत्तमाच्या सेवेने कसा दूर झाला याचे वर्णन केले आहे. शेवटी कळसाचा हा एकतिसावा अध्याय यात संपूर्ण अध्यायातील कथांचे सार दिले आहे.

नारायण म्हणाले, ''लक्ष्मी, हा एकतिसावा एकच अध्याच जरी वाचला किंवा ऐकला तरी माणसाला संपूर्ण 'अधिकमास माहात्म्य' वाचल्याचे किंवा ते पूर्ण ऐकल्याचे पुण्यफळ प्राप्त होते.''

सूत पुराणिकांनी हे संपूर्ण अधिक महिन्याचे माहात्म्य आणि लक्ष्मीनारायण यांचा संवाद सर्व ऋषींना सांगितला. तो ग्रंथ मूळ संस्कृत भाषेत आहे. त्याचे ओवीबद्ध रूप अनेकांनी केलेले आहे. त्या ओवीबद्ध पोथीचे हे कथारूप रूपान्तर वाचकांना खचितच आवडेल असा विश्वास आहे.

॥ श्रीकृष्णार्पणमस्तु ॥

★ समाप्त ★





## ॥ आरती ॥

ओवाळू आरती। आता पुरुषोत्तम प्रभुला।
नियम व्रते पाळिती। पावतो सत्वर भक्ताला ॥धृ॥

दरवर्षाचा। दशदिवसांचा। मळ काढुन केला।
अधिक महिना। तीस दिनांचा। काळ मेळ बसविला।
मंगलकार्ये। वर्ज्य त्यामधी। पुण्यकर्म करिती।
मलमासाला। कृष्णकृपेने। पुरुषोत्तम मानिती।

अंधाराचा नाश कराया। दिव्य दीप लाविला।
नियम व्रते पाळिती। पावतो सत्वर भक्ताला ॥१॥

गुणसुंदरिला। द्रौपदिला अन्। चंद्रकलाराणीला।
अधिककमासव्रत। पुण्याईने। प्रसन्न प्रभु झाला।
स्नान, दान, जप। मौन भोजने। कुबुद्धि सारावी।
दुर्व्यसनांचा। त्याग करावा। चैन सर्व सोडावी।

आनंदघनराम पुण्यप्रद हा। मार्ग दावि सकला।
नियमव्रते पाळिती। पावतो सत्वर भक्ताला ॥२॥